


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर, गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा. **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्टस्, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

# मौनं सर्वार्थ साधनम्

भाषा या शब्दातील धातू 'भाष्' याचा अर्थ आहे बोलणे. म्हणूनच जी बोलली जाते ती 'भाषा', अशी तिची सोपी व्याख्या केली जाते. मानवी व्यवहारात भाषेतूनच संवाद साधला जातो, भावनेची व ज्ञानाची देवाणघेवाण केली जाते. भाषेच्या लिखित रूपाचा किंवा लिपिबध्द रूपाचा वापर ज्ञानाच्या क्षेत्रात मोठ्या प्रमाणात केला जा्त असला तरी प्रामुख्याने भाषेच्या ध्वनिरूपाचाच वापर अधिक प्रमाणात केला जातो. म्हणजेच जेवढे बोलले जाते तेवढे कधीच लिहिले जात नाही. म्हणूनच जी बोलली जाते ती भाषा, ही तिची व्याख्या सार्थ ठरते. प्रकटपणे किंवा प्रत्यक्षपणे बोलत नसतानाही आपण आपल्या मनात भाषेतूनच बोलत असतो, विचार करत असतो. आपल्याशीच संवाद करत असतो. आपला आपल्याशी चाललेला हा संवाद, मनातल्या मनात चालत असल्याने अर्थातच मूकपणे चाललेला असतो. परंतु काही वेळा दुसऱ्याशी किंवा दुसऱ्या व्यक्तीशी संवाद करत असतानासुध्दा मूक संवादाचा अवलंब केला जातो. मूकपणेच काहीतरी बोलले जाते. म्हणूनच आजपर्यंत मौनाचा अनेक अर्थाने, अनेक प्रकाराने झालेला वापर महत्त्वाचा ठरला आहे. आपल्या जीवनात एक विशिष्ट स्थान असणाऱ्या डोळ्याच्या भाषेत किंवा स्पर्शाच्या भाषेत तर मौन ही पहिली अट असते हे सांगायला नकोच.

भारतीय संस्कृतीत मौनाला एक मोठी परंपरा आहे. ऋषी-मुनींनी चिंतन करण्यासाठी, ब्रह्माचे कोडे उकलण्यासाठी वर्षानुवर्षे मौनाचा अवलंब केलेला आहे. जैन धर्मातही मौनाला अनन्यसाधारण महत्त्व आहे. आजही जैनधर्मीयांच्या व्रतांमध्ये मौनी एकादशी (मौन अग्यारस)चा उपवास श्रध्देने केला जातो. महात्मा गांधींनी सत्याग्रहाच्या चळवळींमध्ये मौनाचा साधन म्हणून केलेला वापर परिणामकारक ठरला आहे. बोलण्यामुळे मानसिक आणि शारीरिक शक्तीचा व्यय होतो म्हणून आधुनिक काळातही विनोबांसारख्या साधुसंतानी मौन पाळण्याच्या व्रताचे पालन केले आहे गौतमबुध्दाने स्वतःला ओळखण्यासाठी आणि स्वसुधारणेसाठी विपश्यना व्रताचा पुरस्कार केलेला आहे. आज या विपश्यनेचा प्रसार मोठ्या प्रमाणात होताना दिसतो आहे. एवढेच नाहीतर किरण बेदींनी तिहार

जेलमध्ये कैद्यांच्या मानसिक उन्नतीसाठी केलेला विपश्यनेचा प्रयोग उपयुक्त ठरला आहे. ही झाली मौनाची आध्यात्मिक पातळीवरची आविष्कार रूपे.

सामान्यांच्या व्यावहारिक पातळीवर, त्यांच्या दैनंदिन व्यवहारातही मौनाचे महत्त्व त्यांनी ओळखलेले असल्याचे आपल्या सहज ध्यानात येते. सामान्य माणूसही मूक राहूनच त्याच्यापरीने स्वतःशी संवाद साधण्याचा प्रयत्न करत असतो. कारण स्वतःशी प्रकटपणे बोलले तर जग आपल्याला 'वेडे' ठरवेल हे शहाणपण त्याच्याजवळ उपजतच असते. या व्यावहारिक शहाणपणातूनच तो कधी कधी मूक संमती देण्याचा प्रयोग करत असतो. वेगवेगळ्या प्रसंगांत किंवा वेगवेगळ्या संदर्भांत मौनाचे प्रयोग केले जात असतात. त्यातूनच काही म्हणी किंवा वाक्प्रचार रूढ झालेले दिसतात. 'मौनं संमति लक्षणम्', 'न बोलून शहाणा', 'न बोलून नवगुणा', 'मूग गिळून गप्प बसणे' किंवा 'तोंडाला कुलूप लावणे' अशी कितीतरी उदाहरणे सापडतील. कधी कधी 'गप्प बसणे' किंवा 'चूप बसणे' हे सामाजिकदृष्ट्या 'आवाज बंद' करणेही असते. तर कधी 'तोंड दाबून बुक्क्यांचा मार'ही दिला जातो. मौनासंबंधीचे मर्म 'पंचतंत्र'कारांनीही सांगितले आहे -

आत्मनी मुखदोषेण बध्यन्ते शुकसारिकाः ।
बकास्तत्र न बध्यन्ते मौनं सर्वार्थ साधनम् ॥

(पंचतंत्र - ४.४८)

(आपल्या तोंडाच्या बडबडीच्या दोषाने पोपट आणि मैना पिंजऱ्यात अडकतात. बगळे मात्र अडकत नाहीत. मौन सर्व काही साधणारे आहे.) या श्लोकातील 'मौनं सर्वार्थ साधनम्' ही ओळ मराठीत प्रचलित झाली आहे आणि सर्व हेतू साध्य करण्याचे मौन हे साधन आहे, या शहाणपणाला / तत्त्वाला एक प्रतिष्ठा मिळाली आहे. गप्प बसणे हे माणसाला पुष्कळ वेळा वाचवते - त्याचे काम करून देते, हे खरे असले तरी काही वेळा किंवा नको तेव्हा गप्प बसणे हे हानिकारकही ठरू शकते, हे मात्र सुज्ञांनी ओळखावे लागते.

"न बोलण्याच्या" या भाषेची महती जगातील सर्वच भाषांनी कमी-अधिक फरकाने गायली आहे. इंग्रजीत 'mute communication' असते किंवा 'speech is silver and silence is golden', 'read between the lines' असे सांगितले जाते.

कलेच्या प्रांतातही मौनाची प्रचीती अनेक प्रकारे येते. संवाद हे माध्यम असणाऱ्या नाटकात शब्दाविना संवाद लक्षणीय ठरतो. शाब्दिक संवादाच्या मर्यादा











ओलांडून गेल्यावरच अभिनयाची भाषा अवगत होते. म्हणूनच नाट्यकलेत मूक अभिनयाला निःशब्दतेला महत्त्व प्राप्त झाले आहे. एवढेच नव्हे तर नाटकातील 'पॉज' ज्याला जमतो तोच खरा अभिनेता असे म्हटले जाते. साहित्यातील किंवा कवितेतील दोन ओळींच्यामधून व्यक्त होणारा भावाशयच त्या कलाकृतीला कलात्मक पातळी देतो. शब्द हाच मूलाधार असणाऱ्या वक्तृत्वकलेमध्ये वक्त्याची व्याख्या, 'काय बोलावे यापेक्षा काय बोलू नये हे ज्याला समजते तो' अशी केली जाते. पण गंमत अशी आहे की, रंग-रेषा आणि आकार हे माध्यम असणाऱ्या शिल्पचित्रादी कलांमध्ये रसिकांशी संवाद साधताना कधीकधी रंगरेषाच शब्दरूप घेतात, असे म्हटले जाते. एकूणच कलेच्या पातळीवर रसिकाशी केल्या जाणाऱ्या संवादासाठी 'शब्द' या संकल्पनेमध्ये प्रत्यक्षापेक्षा अप्रत्यक्षपणे सूचित केलेल्या अर्थाला महत्त्वाचे स्थान आहे. म्हणजेच मौनात कलार्थ व्यक्त होतो.

तर असे हे मौनाचे विविध आविष्कार! मौनासंबंधीचा हा मी माझ्याशीच केलेला संवाद, तुमच्याशी संवाद साधेल का?

■

मृणालिनी शहा
१, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

**मुखपृष्ठाच्या चित्रावरून आठवणाऱ्या ओळी**

"वाटते झाडांसारखेच व्हावे फक्त निःशब्द
बहर येतानाही आतून"

– द. भा. धामणस्कर



अनुक्रमणिका








# ‘अपूर्वाई’मधील भाषेचे संवेदन

डॉ. नीलिमा गुंडी

पु.ल. देशपांडे हे मराठी भाषेशी समरस झालेले एक महत्त्वपूर्ण लेखक होते. त्यांनी नाट्य, प्रवासवर्णन, व्यक्तिचित्रण इ. विविध वाङ्मयप्रकारांमध्ये विनोदनिर्मिती केली आहे. त्यांच्या सर्वच लेखनातून व्यक्त होणारे भाषेचे संवेदन हे स्वतंत्रपणे लक्षात घेण्याइतके महत्त्वाचे आहे. प्रस्तुत लेखात ‘अपूर्वाई’ या त्यांच्या गाजलेल्या प्रवासवर्णनात उमटलेले भाषेचे संवेदन जाणून घेण्याचा प्रयत्न आहे.

‘अपूर्वाई’ (१९६०) मध्ये पु.ल. यांनी परदेशप्रवासाचा अनुभव आत्मचरित्राशी जवळीक करणाऱ्या शैलीत विनोदी ढंगात कथन केला आहे. या परदेशप्रवासात मुख्यतः इंग्लंड आणि जाता जाता फ्रान्स आणि जर्मनी या देशांचे चित्रण येते. त्यामुळे एका मराठी भाषकाचे या परकीय भाषांविषयीचे संवेदन यातून लक्षात येते. हे संवेदन मुख्यतः दोन प्रकारचे आहे. स्वतंत्र लोकशाही राष्ट्रातील एका नागरिकाचे संवेदन हे त्याचे एक रूप आहे. तसेच एका कलावंत मनाचे संवेदन हे त्याचे दुसरे रूपही आहे.

‘अपूर्वाई’त उमटलेले एका स्वतंत्र, लोकशाही राष्ट्रातील सर्वसामान्य नागरिकाचे संवेदन प्रथम लक्षात घेऊ या. वास्तविक इंग्रजी ही भाषा परकीय असली तरी लेखकाला ती अनोळखी अशी भाषा नव्हती. इंग्रजांच्या भारतातील राजकीय वर्चस्वाच्या काळात इंग्रजीचा स्वीकार करणे अपरिहार्य ठरले होते. तेव्हा ‘अपूर्वाई’मधील लेखकाचे संवेदन हे भारतीय पर्यावरणात इंग्रजी शिकलेल्या व्यक्तीचे इंग्लंडमध्ये कानी पडणाऱ्या (यात लिखित भाषेचे संवेदन कमी प्रमाणात आहे.) इंग्रजीविषयीचे संवेदन आहे. ते काही अंशी प्रातिनिधिक आहे. त्यात विविध भावनांच्या छटा दडलेल्या आहेत. इंग्रजीविषयी कौतुकाच्या भावनेबरोबरच त्यात सूक्ष्म अढीही आहे आणि इंग्रजीची धास्तीही आहे. “गोऱ्या माणसाने आम्हांला ‘सर’ म्हटल्याचा हा पहिला-वहिला प्रसंग!”[१] असे ते इंग्लंडला जाण्यापूर्वी, ‘एका इंग्रजी उपाहारगृहातील अनुभवाचे वर्णन करतात, ते उगीच नाही.’ सारे तर्खडकर, काळे, मॅकमिलन आणि नेल्सन कोळून पिऊनही इंग्रजी हॉटेलात जाऊन






चहा कसा प्यावा अगर चार ताटे कशी मागवावी, हे काही शिक्षण मिळाले नव्हते."[२] हे म्हणण्यापूर्वीचा त्यांचा फजितीचा प्रसंगही येथे आठवतो. इंग्लंडला तर अशी फजिती अधिक प्रमाणात होते. किलबनी स्टेशनात पिकॅडलीची तिकिटे मागतानाचा विनोदी प्रसंग याच धर्तीचा आहे. या आणि अशा प्रसंगांवरील त्यांचे भाष्य मार्मिक आहे. ते असे - "साहेबांचे इंग्रजी एकूणच निराळे. आपल्या देशात इतकी वर्षे राहून त्याने खरे इंग्रजी आपल्यापासून, खांसाहेब काही चिजा चोरून ठेवतात तसे चोरून ठेवलेले दिसते."[३] तत्कालीन इंग्रजी शिक्षणाविषयीचे असमाधान लेखकाने असे विनोदाच्या अवगुंठनातून व्यक्त केले आहे.

मात्र केवळ ही एकच एक भूमिका या लेखनात नक्कीच नाही. साहेबाने शब्दांच्या भांडवलावर अनेक ठिकाणी राज्य केले, कारण त्यांची भाषा मोठी सहनशील होती. हेही ते नमूद करतात. 'इंग्रजी गद्याच्या मराठी अवतारा'ची उदाहरणे ते देतातच. त्याचबरोबर अनेक भारतीय भाषांच्या सहवासाने बिघडलेल्या इंग्रजीची रूपेही ते मार्मिक निरीक्षणातून टिपतात. ती अशीः दाक्षिणात्य उच्चारपद्धतीत बाथरूमची होणारी 'भातरूम', वंगबंधूला, 'हॅपी न्यू इयर' म्हटल्यावर त्याने 'शेम टु यू' असे दिलेले उत्तर इत्यादी. राष्ट्रभाषा होताना हिंदीनेही 'अशी' तयारी ठेवली पाहिजे, असा ते हसतहसत इशाराही देतात!

लोकशाही व्यवस्थेत सर्वसामान्यांपर्यंत पोहोचणारी 'लवचिक भाषा' पु.ल. यांना जवळची वाटते. त्यांनी स्टेशन, एस्.टी.स्टँड इ. सार्वजनिक ठिकाणी ऐकू येणारे भाषेचे हेल वेळोवेळी टिपले आहेत. स्वतःच्या नावाचा 'पूल्देसपांडे' असा उच्चार करणारी माणसेही त्यांनी सहज स्वीकारली आहेत. त्यांनी अनेकदा पढिकतेची खिल्ली उडवली आहे. ग्रांथिक भाषेतील पांडित्यप्रचुरता त्यांना मानवत नाही. "रक्ताला कुणी रुधिर म्हटले की त्यापुढे मला एकदम 'शिरच्छेद, धारातीर्थ-बलिदान' वगैरे भारी प्रकृतीचे शब्द आठवतात."[४] असे त्यांचे म्हणणे पडते. जिब्राल्टर, मेडिटरेनियन या शब्दांच्या स्पेलिंगने दरवर्षी धोका दिल्याची त्यांची आठवणही याला पोषकच आहे. वास्तविक पु.ल. हे बहुश्रुत अभिजात अशा कला-साहित्याच्या संस्काराने पैलू पडलेले लेखक होते. अशा वेळी पढिकतेची खिल्ली उडवणारी त्यातील भाषिक संवेदनशीलता मात्र सर्वसामान्यांना जवळची वाटावी अशी आहे. खरे तर पु.ल. हे काही सर्वसामान्य ठशाचे व्यक्तिमत्त्व मुळीच नव्हते. परंतु ते मध्यमवर्गीय वातावरणात वाढले. त्यामुळे अशा प्रकारची संवेदनशीलता त्यांच्यात टिकून राहिली असावी. दुसरे म्हणजे स्वतःला इतरांपेक्षा वेगळे न





अनुक्रमणिका

समजण्याची इच्छाही त्यामागे असावी किंवा आपल्या लेखनात सर्वसामान्य वाचकांचा मानसिक सहभाग प्राप्त करून घेण्याची ती क्लृप्तीही असावी!

माणसामाणसांत निर्माण झालेल्या सामाजिक उतरंडी भाषेच्या माध्यमातून कमी व्हाव्यात, अशी भावना पु.ल. यांच्या लेखनातून नक्कीच जाणवते. इंग्लंडमधील लिफ्टमन तिसऱ्या - चौथ्या दिवसापासून त्यांना 'पी.एल.' म्हणायला लागला. याचे त्यांना कौतुक वाटते. "लोकशाहीदेखील रक्तात मुरावी लागते"[५] असे त्यांचे याबाबतचे भाष्य आहे. तेथील यांत्रिक जीवनात अनेक शब्दप्रयोगांनी येणारी स्निग्धता त्यांना आकर्षित करते. सामाजिक अभिसरणाला चालना देणारी, मने सांधणारी भाषेची शक्ती येथे नकळत अधोरेखित होते.

स्वतंत्र राष्ट्रातील नागरिकाच्या मनात देशी भाषांविषयी असणारी आत्मीयता पु.ल. यांच्या लेखनातही दिसते. त्यांचा एडिंबरोला वाईच्या ॲक्सेंटमधील मराठी कानी पडल्यावरचा अनुभव वाचावा. तसेच प्रवास संपवून येताना बोटीमध्ये ते स्टुअर्डशी 'इंग्लिश सगळी झाडोनि' कोकणीतून सलगी करतात, हेही लक्षात घ्यावे.

पु.ल. यांच्या मनात भाषेविषयी असणारी आस्थाबुद्धी त्यांच्या विखुरलेल्या चिंतनातून जाणता येते. संस्कृतीचे एक अंग या नात्याने भाषेने आपले जीवन व्यापलेले असते. पु.ल. यांच्या मते त्यात चिल्लर गोष्टींनाही महत्त्व असते. उदा. "पिठले आणि झुणका ह्यांच्या सीमारेषा कुठल्या? हे कळणे अधिक महत्त्वाचे."[६] भाषेचे सरधोपट पातळीवरील आकलन आणि भाषेतील सूक्ष्मता यांतील फरक हा दोन व्यक्तींच्या 'भावनात्मक एकात्मते'च्या संदर्भात महत्त्वाचा ठरतो.

खरे तर पु.ल. हे भाषेकडे एक 'जीवनद्रव्य' म्हणून पाहतात, हे लक्षात येते. पाण्यात जशा अनेक गोष्टी सहजपणे विद्राव्य असतात तशी भाषेच्याद्वारेही मनामनांतील किल्मिषे विरघळून जाऊ शकतात. जगण्याचे प्रवाहीपण त्यातून टिकून राहते. पु.ल. यांच्यातील कलावंतमनाने टिपलेले भाषेचे संवेदन येथे लक्षात घ्यायला हवे. जातिवंत कलावंताला मानवी संस्कृतीविषयी वाटणारी आस्था देशकाल संदर्भापुरतीच मर्यादित नसते. अशा कलावंतमनाला भाषा ही व्यक्तीचे मानसिक क्षितिज रुंदावण्यास मदत करणारी बाब म्हणून जवळची वाटते. त्यामागे व्यापकतेची ओढ असते. येथे मग इंग्रजी ही 'आपल्यावर राजकीय वर्चस्व गाजविलेल्यांची भाषा' असा सल उरत नाही. कारण वेगळ्या सांस्कृतिक पर्यावरणातील व्यक्ती जाणून घेण्याचे माध्यम म्हणून ती भाषा मदतीला येत असते.

अनोळखी व्यक्तींच्या मनाचे दार उघडणारी ‘कळ’ म्हणून ती भाषा उपयोगी पडते अशी ‘अंतरीची खूण’ जुळावी, आपल्याकडील मास्तर, कारकून वगैरे माणसांच्या इंग्रजी बांधणीच्या आवृत्त्या पहाव्या, ही पु.ल. यांची प्रवासातील इच्छा आहे. इंग्रजी घरातील किंवा रस्त्यातील शांतता त्यांना म्हणूनच भयाण वाटते. भाषेचे अस्तित्व ही त्यांच्यासाठी जणू मानवी अस्तित्वरूपी समुद्राची गाज असावी! त्यांना जेव्हा ‘आता काय कपडे धुण्याच्या यंत्राशी बोलू?’ अशी हळहळ व्यक्त करणारी एक ‘गृहिणी’ तेथे भेटते, तेव्हा हायसे वाटते!

पु.ल. यांच्यातील कलावंताचे संवेदन आणखी एकप्रकारे व्यक्त होते. ते म्हणजे शब्दांचे भाषांतर करण्याच्या खास लकबीतून! त्यांची भाषांतरशैली ‘यथार्थदीपिके’सारखी नाही. ती शैली समांतर सांस्कृतिक संदर्भ टिपणारी आहे. ‘पी-सूप’ धुके म्हणजे कोकणातल्या गुळवणीइतके दाट धुके (देशावरच्या मंडळींनी पिठल्याइतके दाट म्हणावे)”[७] अशी पुस्ती ते जोडतात.

कलावंतमनाचे संवेदन हे आलंकारिक ढंगाचे असते. पु.ल. यांचे संवेदनही आलंकारिक आहे. विशेषतः फ्रेंच, जर्मन या त्यांना परक्याच राहिलेल्या भाषांबाबत लिहिताना अलंकरण जास्त येते. कारण त्या भाषा त्यांच्या लेखी जणू अमूर्तच राहिल्या आहेत. त्यामुळे ऐंद्रिय प्रतिमांच्याद्वारे ते आपली प्रतिक्रिया व्यक्त करतात, ती अशी : “फ्रेंच भाषेची तुलना करायची झाली तर शँपेनशीच करावी लागेल. ही भाषा बाटलीतून ग्लासात ओतल्या जाणाऱ्या शँपेनसारखी खळखळते-फसफसते-जिभेच्या शेंड्याशी सारखी लडिवाळपणा करीत असते.”[८] पु.ल. यांनी पुढे नाद, स्पर्श, रस, गंध आणि रूप संवेदनांशी निगडित प्रतिमांच्याद्वारे आपले संवेदन जिवंत केले आहे.

कोणत्याही मोठ्या लेखकाला भाषेच्या शक्तीइतकीच तिची मर्यादाही उमजलेली असते. पु.ल. यांच्या बाबतीतही हा अनुभव येतो. त्यांनी मार्सेल मार्सोच्या मूकाभिनयाच्या कार्यक्रमाविषयी लिहिले आहे. शेक्सपिअरच्या समाधीपाशी उभे राहिल्यावर आलेले मूकपण नोंदवले आहे. कधीकधी व्यवहारात ‘करपल्लवी’चा करावा लागणारा वापर आणि भाषा न कळताही काही वेळा घडणारा हृदयसंवाद यांचेही चित्रण अपूर्वाईत आले आहे.

पु.ल. यांना भाषेचे विलक्षण तल्लख असे भान होते. त्यांना शब्दाचे दृश्य रूप, शब्दाचा नाद, शब्दातील अनेक अवयव, शब्दाला लगडलेले अनेक भाषिक, वाङ्मयीन आणि सामाजिक संदर्भ झटकन आठवत असत. ‘अपूर्वाई’मधील अनेक

शब्दनिष्ठ विनोद वाचताना हे जाणवते. उदा. नव्या शिंप्याने शिवलेला सूट घातल्यावर 'एकदाचा मी 'सुट'लो'[8] हे त्यांचे त्या अनुभवाविषयीचे भरतवाक्य आठवावे.

एकंदरीत 'अपूर्वाई'मध्ये पु.ल. यांचे एक सर्वसामान्य नागरिक या नात्याने आलेले भाषेचे संवेदन आणि एक कलावंत या नात्याने आलेले भाषेचे संवेदन सहजपणे एकरस झाले आहे. त्यामुळे हे लेखन वाचकांना आपलेही वाटते आणि त्यांच्या मनात जीवनानुभवाच्या व्यापकतेची ओढ निर्माणही करते. 'अपूर्वाई'च्या यशाचे हे एक गमक आहे.

**संदर्भ :**


१. *देशपांडे पु.ल. 'अपूर्वाई', श्री विद्याप्रकाशन, पुणे. आवृत्ती ७, १९८२, पृ. १८*

२. *तत्रैव, पृ. १९*

३. *तत्रैव, पृ. ६८*

४. *तत्रैव, पृ. ५४*

५. *तत्रैव, पृ. १२६*

६. *तत्रैव, पृ. २३८*

७. *तत्रैव, पृ. १८८*

८. *तत्रैव, पृ. २००*


■


**३, अन्नपूर्णा, १२५९ शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे - २**

**दखलपात्र**

# विज्ञान, तंत्रज्ञान आणि मराठी भाषा

**जयंत नारळीकर**

'काय?', 'कसे?' आणि 'का?' या प्रश्नांतून विज्ञान हा विषय जन्माला आला आणि या प्रश्नांची उत्तरे शोधता शोधता त्याचा नकळत विकास होत गेला. निसर्गाच्या व्यवहारांमागे काही सुसूत्रता आहे... ते कोणाच्या लहरीवर अवलंबून नसून काही ठरावीक चाकोरीतून चालू असतात, याचा प्रत्यय मानवाला हळूहळू झाला आणि त्यामागचे रहस्य उकलताना त्याला विज्ञानाचा साक्षात्कार होत गेला. वर फेकलेली वस्तू खाली येते, पृथ्वी सूर्याची प्रदक्षिणा करते, समुद्रात ठरावीक वेळी भरती येते... ह्या विविध स्वरूपाच्या घटनांमागे विज्ञानाचा एकच नियम आहे. आकाशात चमकणाऱ्या विजा, इंद्रधनुष्याचे सात रंग किंवा लोहचुंबकाचे आकर्षण हे सर्व एकाच नियमात बसतात.

विज्ञानाची माहिती मिळवता मिळवता तिचा उपयोग आपल्या जीवनक्रमात करायला मानवाने सुरुवात केली... आणि तेथूनच तंत्रज्ञानाचा प्रारंभ झाला. प्राथमिक तंत्रज्ञान अवतरले तेव्हा आदिमानवाने कृत्रिम मार्गांनी अग्नी निर्माण केला. ऊर्जानिर्मितीचा तो पाया समजला पाहिजे. आजच्या विज्ञानयुगात अतिवेगाने वाढणाऱ्या तंत्रज्ञानामागे तीच ऊर्जानिर्मिती आहे.

विज्ञान हे जिज्ञासेतून विकसित होते तर तंत्रज्ञान हे गरजेतून. प्रश्न विचारून, वाद घालून, प्रयोग करून, तपासणी करून विज्ञानाचा पाया घट्ट केला जातो. तसेच इहलोकात जगण्याची जिद्द असेल; आपले राहणीमान सुधारण्याची अहमहमिका असेल तरच नवे तंत्रज्ञान निर्माण करायची क्षमता येते.

आजचे युग हे विज्ञान-तंत्रज्ञानाचे युग आहे, विज्ञानात नवनवीन शोध लागत आहेत आणि त्यांचे रूपांतर वेगाने उपयोजित तंत्रज्ञानात होत आहे. अशा वेगवान जीवनात विज्ञान आणि तंत्रज्ञानापासून अलिप्त राहणे कुठल्याही समाजाला परवडणारे नाही. अशा पार्श्वभूमीवर मराठी भाषेचे काय स्थान राहील? प्रथम विज्ञानाच्या संदर्भात पाहू.



अनुक्रमणिका

## पाठांतर नव्हे, विचारमंथन

विज्ञान हा पाठांतराचा विषय नव्हे. तो खरोखर समजला पाहिजे... म्हणजे त्यामागे मेंदूला विचार करण्याचे श्रम घ्यावे लागतात. मेंदूची दोन कामे असतात. एक म्हणजे माहिती साठविणे आणि तिचा हवा तो भाग जरूर असेल तेव्हा काढून देणे. दुसरे काम म्हणजे विचार करून त्या माहितीतून नवी कल्पना, नवे तर्क, नवे निष्कर्ष काढणे. पहिला भाग पाठांतराचा आहे, दुसरा सृजनाचा.

पाठांतराच्या बाबतीत संगणक मानवी मेंदूच्या पुढे गेला आहे, पण सृजनक्षमतेबाबतीत मानव संगणकाच्या पुढे आहे. विज्ञानाचा विकास करायला हवी असलेली सृजनक्षमता यायला मेंदूत विचारमंथन होणे आवश्यक असते. सामान्यपणे हे विचारमंथन एखाद्या भाषेच्या माध्यमाने होते. ते ज्या भाषेत होत असेल त्या भाषेत मेंदू विज्ञान समजून घेत असतो आणि (शक्य झाल्यास) त्यात भर टाकतो.

हे विचारमंथन मातृभाषेत होत असते असे मानले जाते. अनेक भाषा बोलणाऱ्या गृहस्थाची मातृभाषा शोधून काढण्याचे कसब नाना फडणिसाने दाखविल्याची आख्यायिका आहे. प्रत्येक व्यक्तीची मनात विचार करण्याची जी एक निश्चित भाषा असते तीच भाषा विज्ञानासाठी स्वाभाविक समजली पाहिजे. ह्या लेखासाठी मी त्या भाषेलाच 'मातृभाषा' म्हणेन. विशेषकरून विज्ञानाच्या प्राथमिक शिक्षणासाठी हीच भाषा सर्वथैव योग्य आहे.

## विज्ञानाची ओळख मातृभाषेतून

सध्याचे विज्ञान युरोपातून आले म्हणून त्याचे प्राथमिक शिक्षण युरोपियन भाषेतून दिले पाहिजे हा अट्टहास चुकीचा आहे. स्वतः विज्ञान हा विषय अमुक एका देशातला म्हणून त्या देशाची छाप घेऊन आलेला नसतो. पाण्याप्रमाणे विज्ञानदेखील निर्गुण आहे. टँकरमधले किंवा नळातले पाणी आपण आपल्या सोईने योग्य त्या भांड्यात साठवितो आणि पितो. न्यूटनने जुन्या इंग्रजीत मांडलेले नियम जर मराठी भाषकाला मराठीत समजत असतील तर ते त्या भाषेतच सांगितले पाहिजेत. त्यामुळे त्या नियमांची विश्वासार्हता नष्ट होत नाही. त्यांतील तथ्ये शाबूत राहतात.

सामान्य अनुभव असेच सांगतो, की कुठलीही प्राथमिक स्वरूपाची वैज्ञानिक माहिती मातृभाषेतून अधिक सहजगत्या कळते. इंग्रजीतून विज्ञान शिकणाऱ्या मराठी भाषक मुलाला प्रथम इंग्रजी विधानाचे मराठीकरण मनातल्या मनात करून







मग त्याचा अर्थ लावावा लागतो. पुढे त्या विधानाची छाननी करण्यासाठी लागणारे विचारमंथन मराठीतच केले जाते. ही प्रक्रिया मूळ विधान मराठीत असल्यास अधिक सोपी व सुटसुटीत होते.

प्राथमिक शाळांत इंग्रजीतून शिकविल्या जाणाऱ्या वैज्ञानिक अभ्यासक्रमाकडे दृष्टी टाकल्यास ह्या वस्तुस्थितीची कल्पना येते. 'Air is necessary for breathing.' ह्या वाक्यात दोन मोठाले इंग्रजी शब्द आहेत. त्यांचे स्पेलिंग बरोबर करून अर्थ लावण्याच्या खटपटीत मूळ वैज्ञानिक तथ्य बाजूला पडते. ह्या वाक्यातील तथ्य मराठी विद्यार्थ्याला 'श्वास घेण्यासाठी हवेची जरुरी असते', अशा सोप्या शब्दांत सांगता येते आणि हाच मुद्दा सामान्य माणसाला विज्ञान समजावून सांगताना विचारात घेतला पाहिजे.

### इंग्रजीचा अव्हेर नको

मराठीतून अथवा अन्य देशी भाषांतून विज्ञान सांगण्यासाठी पारिभाषिक शब्दांचा बागुलबुवा उपस्थित केला जातो. इथे चूक दोन्ही बाजूंकडून होते. देशी भाषांचे कट्टर समर्थक नवे पारिभाषिक शब्द वापरण्याचा हट्ट धरतात. कित्येक पारिभाषिक शब्द मूळ इंग्रजी शब्दांपेक्षा बोजड, क्लिष्ट आणि ओढूनताणून तयार केलेले वाटतात. पारिभाषिक शब्दांबद्दल माझे मत असे आहे; सोपे, प्रचारातले इंग्रजी पारिभाषिक शब्द जसेच्या तसे मराठीत घ्यायला हरकत नाही.

कुठलीही भाषा नव्या शब्दांमुळे समृद्ध होते. इतर भाषांतून आलेले शब्द आत्मसात करून इंग्रजी भाषा समृद्ध झाली. हिंदी, मराठीसारख्या भाषांनाही काही प्रचलित इंग्रजी वैज्ञानिक शब्द आहेत त्या रूपात वापरणे वावगे वाटू नये. रेडिओ, टेलिफोन, पोस्टऑफिस सारखे इंग्रजी शब्द आता मराठीत रूढ झाले आहेत. रेडिओसाठी संस्कृतजनित एखादा क्लिष्ट शब्द तयार करण्यात अर्थ नाही. अनेकदा मराठीतून विज्ञान सांगताना 'शुद्ध' भाषेच्या आग्रहाखातर अनोळखी बोजड शब्दांचा भडिमार केला जातो आणि त्यामुळे वैज्ञानिक विधान मातृभाषेतून देखील कळत नाही. समाज प्रबोधनासाठी विज्ञानाची माहिती देताना, 'इंग्लंडातून आलेले विज्ञान त्याच देशाच्या भाषेतून कळेल.' असा आग्रह धरणे जितके चुकीचे आहे तितकेच वरील शुद्ध संस्कृतजनित भाषेचा वापर करणेही सदोष आहे. मातृभाषेतून विज्ञान सांगण्याचे कसब ह्या दृष्टिकोनांच्या दरम्यान सापडेल.

स्वातंत्र्योत्तर काळात विविध भारतीय भाषांतून पारिभाषिक शब्द तयार करण्यावर पुष्कळ भर दिला गेला; पण एका महत्त्वाच्या गोष्टीचे भान राखले गेले



अनुक्रमणिका

नाही. एका उदाहरणाने हा मुद्दा स्पष्ट होईल. Atom आणि Molecule साठी मराठी पारिभाषिक शब्द आहेत 'अणू' आणि 'रेणू', हिंदीत मात्र हे पारिभाषिक शब्द आहेत, 'परमाणु' आणि 'अणु'. गंमत म्हणजे हे सगळे शब्द संस्कृत भाषेतून तयार केले आहेत! ज्या भारतीय भाषा संस्कृतपासून जन्मल्या त्यांना हे वैज्ञानिक शब्द तेच ठेवता आले नसते का?

प्राथमिक शिक्षणापासून, उच्चशिक्षण आणि संशोधन हे दुसरे टोक पाहिले तर मात्र असे वाटते, की इंग्रजीचा अव्हेर करून चालणार नाही. वैज्ञानिक संशोधन, मग ते उच्च दर्जाचे असेल तर बऱ्याच वेळा देशाची, राष्ट्रांची मर्यादा ओलांडून आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे असते. तेथे विचारांची देवाण-घेवाण प्रांतिक भाषेतून न होता आंतरराष्ट्रीय भाषेतून होते आणि इथे इंग्रजी भाषाच योग्य ठरते. इथे इंग्रजीकडे गुलामगिरीची भाषा म्हणून न पाहता देशा-देशांना जोडणारी भाषा म्हणून पाहिले पाहिजे. उच्चशिक्षणासाठी देखील इंग्रजीतून प्रसिद्ध होणारा ग्रंथसमुदाय आणि नियतकालिकांचे जाळे उपयोगी पडते. इंग्रजीच्या अनाठायी द्वेषामुळे आपले विद्यार्थी आणि संशोधक ह्या समृद्ध साधनाला मुकतील. ह्या कारणांमुळेच रशिया, जपान, चीनसारख्या देशांमध्येसुद्धा विज्ञानाच्या आंतरराष्ट्रीय प्रवाहात सामील होण्यासाठी इंग्रजीची निकड भासू लागली आहे. इंग्रजी आत्मसात करायला तेथील शास्त्रज्ञांना जेवढे कठीण जाते तेवढे आपल्या देशातील शास्त्रज्ञांना जात नाही. कारण इंग्रजीचा वारसा अद्याप ह्या देशात टिकून आहे.

तेव्हा विज्ञानाच्या शिक्षण आणि संशोधनासाठी इंग्रजीकडे एका वेगळ्या दृष्टिकोनातून पाहणे आवश्यक आहे. जरी ती भाषा इंग्रजांच्या वसाहतवादामुळे आपल्यावर लादली गेली तरी आजच्या विज्ञानयुगात देशादेशांतील संलग्न भाषा म्हणून तिच्याकडे पाहिले पाहिजे. संकुचित दृष्टिकोनातून तिचा अवमान करणे देशाच्या प्रगतीच्या दृष्टीने महागात पडेल.

परंतु प्राथमिक शिक्षणासाठी आणि समाज प्रबोधनासाठी विज्ञान मातृभाषेतून सांगितले जावे. तेथे इंग्रजीचा आग्रह धरणे खुळेपणाचे ठरेल.

**तंत्रज्ञान : गरज आणि स्वावलंबन**

आता आपण तंत्रज्ञानाकडे पाहू. आधी सांगितल्याप्रमाणे तंत्रज्ञानाचा विकास व्हायला 'गरज' भासणे आवश्यक आहे. आपले तंत्रज्ञान अविकसित राहिले याचे कारण आम्हां भारतीयांची अल्पसंतुष्ट प्रवृत्ती. इहलोकात आपण भोगतो ते








पूर्वजन्मीचे फळ आणि परलोकात सगळी सुखे आहेतच. अशा भावनेने आणि त्यामुळे इथे राहणीमान सुधारण्यासाठी लागणारी जिद्द नसल्याने आपले तंत्रज्ञानही पुढे जाऊ शकले नाही. युरोपातील गरिबी व निष्ठुर हवामान यांवर तोडगे काढता काढता तेथे तंत्रज्ञान आपोआप आले. कानेकोपरे गाठले आणि आपण मात्र आपली भूमी सोडून परदेशी जाणे म्हणजे पाप असे मानून घरी बसून राहिलो.

गरज भासणे ही पहिली पायरी! ती पूर्ण करणे ही दुसरी! ती सहजगत्या पूर्ण करणे म्हणजे दुसऱ्यांनी तयार केलेले तंत्रज्ञान विकत घेऊन वापरणे. ही सोपी पद्धत आपल्याला परावलंबी करते. त्या उलट उशीर लागला तरी स्वबलावर आवश्यक तंत्रज्ञान निर्माण करणे हे केव्हाही अंततोगत्वा श्रेयस्कर ठरते.

भारताला अलीकडे सर्वाधिक उपभोक्ते असलेला देश म्हटले जाते. आपल्याला तंत्रज्ञान आणि त्यातून निर्माण झालेली सामग्री विकणाऱ्यांच्या दृष्टीने ही आकर्षक बाब असली तरी आपल्या स्वावलंबनाच्या आणि आत्मविश्वासाच्या दृष्टीने खचित नव्हे.

तंत्रज्ञानाबद्दल ओढ निर्माण व्हायला त्याचे आदानप्रदान, त्याची माहिती, नव्याची निर्मिती आदींसाठी देशाची, प्रांताची भाषा महत्त्वाची असते. म्हणून मराठीचा वापर गरजेचा आहे. शहरी समाज सोडला तर महाराष्ट्रात अजूनही मराठीच सार्वजनिक भाषा आहे, पण ती टिकून राहील का?

ह्या प्रश्नाचे उत्तर भाषेच्या उत्क्रांतीवर अवलंबून आहे. भाषेला ह्या नव्या सी.डी. रॉमच्या युगात संगणकाशी जुळवून घ्यावे लागणार. भाषा लिहिण्याचे, संपादन करण्याचे संगणकीय मार्ग शक्य तितके उपयोगकर्त्याच्या सोईचे (Use Friendly) असले पाहिजेत. त्याचप्रमाणे विज्ञान-तंत्रज्ञानातले नवनवे पारिभाषिक शब्द भाषेला खपवून घेता आले पाहिजेत. पण त्याहूनही महत्त्वाचे म्हणजे भाषेत सतत नवनिर्मिती होत राहिली पाहिजे. ही नवनिर्मिती झपाट्याने घडणाऱ्या स्थित्यंतराला सक्षमपणे प्रतिबिंबित करणारी असायला पाहिजे.

कदाचित एक काळ असा येईल जेव्हा सर्व राष्ट्रांचा सारखा विकास होऊन जीवनमानात सारखेपणा येईल. सगळीकडे समानता आली की मग लक्षणीय असे काही घडणार नाही. भौतिकशास्त्रात अशा स्थितीला 'उष्मागतिकीतील समतोल' (Thermodynamic Equilibrium) म्हणतात. त्या दशेत जीवन अतिशय कंटाळवाणे होईल. तशी स्थिती आज नाही आणि निकटच्या भविष्यात येणारही नाही. आपण आशा करू या की, तशी स्थिती पुष्कळ शतके उद्‌भवणार नाही

आणि तोपर्यंत जीवनात विविधता आहे, हास्यरस आहे तसा करुणरसही आहे. सामाजिक असमतोल आहेत, संघर्ष आहेत. विज्ञान-तंत्रज्ञानाच्या गतिमानतेमुळे सभोवतालची एकंदर स्थिती बदलते आहे. ह्या गतिमानतेचे चित्र समर्थपणे प्रतिबिंबित करणाऱ्या भाषाच जिवंत राहतील आणि समृद्ध होतील.

मी आशा करतो, की मराठी भाषा अशा भाषांत असेल आणि शंभर वर्षांनंतर देखील आजच्याप्रमाणे काव्य-शास्त्र-विनोदाबरोबर विज्ञानाला घेऊन पुढे जात असेल.

■

**आयुका, पोस्ट बॅग - ४, गणेशखिंड, पुणे - ४११ ००७**

**('कथाश्री' दिवाळी अंक - २००० मधून साभार प्रसिद्ध)**

---

मराठीच्या अभ्यासक्रम सुसूत्र व्हावा, वेगवेगळ्या शैक्षणिक स्तरांमध्ये अभ्यासक्रमांचे दुवे नीट जुळून यावे म्हणून अभ्यासक्रमांच्या आखणीच्या वेळी बराच विचार केला जातो. शालेय अध्यापनाच्या पद्धतीचीही विचिकित्सा वेळोवेळी केली जाते. परंतु दैनंदिन अध्यापनाचा दर्जा काय असतो आणि विद्यार्थी शुध्द वाणी आणि स्वच्छ व शुद्धलेखन इतकेही शालेय अभ्यासक्रमाच्या शेवटी संपादन करीत नाहीत असे आढळून येते. ही तक्रार इतकी वर्षे ऐकू येत आहे की, आता बऱ्याच शिक्षकांचेही वाचन समजत नाही आणि अक्षर लागत नाही, अशी अवस्था निर्माण झाली आहे. शब्दांचे उच्चार व लय कशी असावी, वाणीची शुद्धता व मधुरता कशी कमवावी याविषयी शिक्षण व नित्यपाठ देणे अत्यावश्यक झाले आहे. अनेकदा तर असे वाटते, की वाचकाला समजावे म्हणून लिहायचे हे जसे आजचे काही लेखक व कवी नाकारू लागले आहेत. तसेच दुसऱ्याला समजावे म्हणून बोलायचे असते हे आपण विसरत चाललो आहोत! आमच्याच पूर्वजांनी केवळ जिव्हेच्या अग्रावर वेदोपनिषदांचे वैभव वागविले आणि अनेक शतके त्यातील लयीलयींचे आणि आरोहावरोहाचे रक्षण केले हे खरेही वाटेनासे होते.

■

**प्रा. कुसुमावती देशपांडे**

**('अध्यक्षीय भाषण' मराठी साहित्य संमेलन, ग्वाल्हेर, १९६१)**



अनुक्रमणिका







# भारतीय शब्दांचा विलायती घरोबा

श्री. बा. जोशी

प्रत्येक प्रचलित भाषेत नित्य नव्या शब्दांची भर पडत असते, ही आपल्या अनुभवाची बाब आहे. आपल्या मराठी भाषेतही इंग्रजी, पर्शियन, पोर्तुगीज, कानडी, तेलगू, हिंदी वगैरे अनेक भाषांतून शब्द आले आहेत. पण इंग्रजी भाषेने ज्या प्रमाणावर परभाषांकडून उसनवारी केली त्याला तोड नाही. त्यामुळेच आज इंग्रजी भाषा अतिशय समृद्ध बनली आहे. त्या भाषेच्या भांडारातील भारतीय शब्दरत्नांची पारख देशी-परदेशी भाषाशास्त्रज्ञांनी वारंवार केली आहे. हा विषय जेवढा महत्त्वाचा आहे तेवढाच मनोरंजकही आहे.

कोणत्याही भाषेत देशकाल परिस्थितीनुसार सतत बदल होत असतात. जिवंत राष्ट्रांची भाषासुद्धा जिवंतपणे वाढत असते. वंश, हवामान, व्यवसाय, वागिंद्रियांची रचना, व्यक्तिगत उच्चारभिन्नता, ऐतिहासिक आणि सांस्कृतिक परिस्थिती, उच्चारसुलभतेकडे प्रवृत्ती, अनुकरणप्रियता, आनुवंशिक संस्कार, नव्याचा हव्यास, जुन्याचा कंटाळा, परकीयांचा संसर्ग अशा एक ना दोन अनेक गोष्टींमुळे भाषेच्या स्वरूपावर परिणाम होत असतात.

दोन भिन्न भाषांचा संनिकर्ष अनेक प्रकारांनी होणे शक्य असते. या संबंधाच्या कमीअधिक तीव्रतेवर शब्दांच्या देवघेवीची तेजीमंदी अवलंबून असते. जेव्हा सबंध देश एखादी परकी भाषा शिकत असतो तेव्हा त्या परभाषेचा एतद्देशीय भाषेवर परिणाम होणे अपरिहार्य असते. कारण परकीय भाषा बोलत असताना आपल्या भाषेतील शब्द त्यात न येतील याबद्दल आपण जागरूक राहतो. पण मातृभाषेत बोलताना अशी बंधने नसतात, आपण अधिक मोकळेपणाने बोलत असतो. सहज परभाषेतील शब्द आले तरी त्यांची पर्वा बाळगीत नाही, एवढेच नव्हे तर शिष्ट आणि भारदस्त वाटावे म्हणून अशा परकीय शब्दांचा वापर मुद्दाम मोठ्या डौलाने करतो.

शब्दांच्या आदान-प्रदानासाठी राजकीय वर्चस्वाची जरूर असतेच असे नाही. पण जेथे असे वर्चस्व वाढत असते तेथे ही देवाणघेवाण अधिक प्रकर्षाने होत असते. परभाषेतील नव्या कल्पना, नव्या वस्तू यांचा निर्देश करणारे शब्द जसेच्या तसे आपलेसे करण्याकडे प्रवृत्ती असते. 'शर्करा' हा मूळ संस्कृत शब्द थोड्याफार फरकाने सर्वत्र आढळतो. उदा. शक्कर (फारशी), सकर (ग्रीक), सॅकार (लॅटीन), झुकेर (इटालियन), त्सुकर (जर्मन), सुकर (फ्रेंच), शुगर (इंग्रजी), इत्यादी.

उच्च दर्जाच्या संस्कृतीतील नवे विचार व्यक्त करणारे शब्द जसेच्या तसे कनिष्ठ संस्कृतीकडून स्वीकारले जातात. इस्रायली, ख्रिश्चन आणि मुसलमान यांचे धार्मिक आणि सांस्कृतिक वाङ्मय पाहिले तर याची सत्यता चटकन पटते. (डेविड, अब्राहाम, इश्माएल, जोसेफ यांसारख्या इस्रायली नावाचे दाऊद, इब्राहिम, इस्माईल, युसुफ असे इस्लामीकरण झाल्याचे आपण पाहतोच). प्रदेश जिंकल्यामुळे, वसाहती-व्यापार वाढल्यामुळे किंवा श्रेष्ठ साहित्याचा प्रभावी प्रसार झाल्यामुळेसुद्धा नवीन शब्द भाषेत येतात.

इतर कोणत्याही पुढारलेल्या भाषांच्या मानाने इंग्रजी भाषा नवीन शब्दांना आत्मसात करण्यास विशेष उत्सुक आढळते. जेथे जेथे इंग्रज गेले तेथे तेथे त्यांनी अर्थसंचयाबरोबर शब्दसंचयही अमाप केला. रोमन साम्राज्यात ब्रिटन होते, त्या काळापासून अँग्लोसॅक्शन भाषेत शब्दांची आयात अविरत चालू आहे. त्यामुळे आजमितीस ती भाषा जगातील वरिष्ठ भाषांच्या श्रेणीत मोडते. युरोपीय भाषांपैकी स्कँडिनेव्हिअन, फ्रेंच आणि लॅटिन या भाषांनी इंग्रजीची सर्वांत अधिक धन केली. सन १६५० पासून हा व्यापार तेजीत आला. या वेळी इतर देशांच्या उदाहरणाने उत्तेजित होऊन ब्रिटिशांनी भारताच्या किनाऱ्यावर वखारी घातल्या. काही वर्षांनी व्यवहार- व्यापार भरभराटला. बारा बंदरांचे पाणी पिऊन लोक विलायतेला परत येऊ लागले. त्यांनी जगाच्या इतर भागांबद्दल आपल्या देशबांधवांत विलक्षण कुतूहल निर्माण केले. या सर्व उलाढालीत भाषा झपाट्याने वाढीस लागली होती. पोर्तुगीज, डच, फ्रेंच या प्रतिस्पर्ध्यांकडूनसुद्धा इंग्रजांनी शब्द उचलले.

आशियाई भाषांपैकी अरबी भाषेने सर्वांत जास्त शब्द इंग्रजीला पुरविले. एके काळी बैझन्टाइन् अरबांनी स्पेनपासून मध्य आशियापर्यंत साम्राज्य गाजविले. युरोपीय संस्कृतीच्या निळ्या प्रवाहात इस्लामी संस्कृतीची हिरवी धारा मिसळली.

सरंजामशाहीच्या आणि भिक्षुकशाहीच्या दडपणाखाली अंधारात पिचत पडलेल्या युरोपात नंतर अनेक ठिकाणी ज्ञानदीप तेवू लागले. या काळात सहस्रावधी अरबी शब्दांनी युरोपीय भाषांत शिरकाव केला. इटली, स्पेन, फ्रान्स असा प्रवास करीत ते इंग्लंडलाही पोचले. त्यांची उदाहरणे असंख्य सांगता येतील. 'अल्' या उपसर्गाने सुरुवात होणारे बरेचसे शब्द अरबी खानदानीचे आहेत. Elixir (अमृत) हा शब्द 'अल्-अक्सीर' या शब्दावरून आलेला. आपणही 'रामबाण औषध' या अर्थी हिंदीमध्ये 'अक्सीर दवा' असा वाक्प्रचार वापरतो. Alchemy' हा शब्द 'अल-किमया' या शब्दावरून साधलेला. 'किमया' शब्द आपल्या परिचयाचा आहेच. 'Alcmbic' हा शब्द 'अल्-इम्बिक्' (औषधे गाळण्याची भट्टी) यावरून आला. 'Alcove' हा शब्द 'अल्-काब्वा' (तंबू) वरून, तर 'Mat', 'Matress' हे शब्द 'अल्मत्राह' (चटई) यावरून आले. 'Syrup' शब्द 'शराब' वरून आला. अल्कोहोल, अल्जिब्रा, अल्मायरा असे अरबी जातकुळीचे अनेक शब्द कोशच घेऊन बसलो म्हणजे सापडतील. Tamarind म्हणजे चिंच. शब्दात इतिहास कसा सापडतो याचे हे साधे उदाहरण. चिंच अरबी प्रवाशांनी प्रथम भारतात चाखली. दिसायला गाभुळलेली चिंच त्यांच्या आवडत्या खजुरासारखी भासली तरी चवीमध्ये जमीन-अस्मानाचा फरक! तेव्हा त्यांनी तिला 'तमर-इ-हिंद' (भारतातील खजूर) असे नाव दिले. आज इंग्रजी चिंच म्हणजे Tamarind असे समीकरण रूढ झाले आहे. Elephant हा असाच शब्द. याच्या व्युत्पत्तीबद्दल भाषाशास्त्रज्ञांत अनेक वाद झाले. अरबी भाषेनुसार त्याची व्युत्पत्ती 'अलेफ्-इ-हिंद' म्हणजे 'भारतातील बैल' अशी असल्याचा दावाही सांगितला जातो. Alpha म्हणजे बैल रोमन वर्णमालेतील प्रथम अक्षर Alpha हे प्राचीन चित्रलिपीच्या काळातील नंदीमुखाकार प्रतिमेवरून आले. 'आल्फा' म्हणजे बैलच. उर्दू वर्णमालेच्या 'अलिफ्', 'बे', 'पे' मधील प्रथम अक्षरातही हा 'आल्फा' आहेच. अर्थात याचे धागे प्राचीन मिसरी वर्णमालेपर्यंत पोचतात.

आजच्या घटकेला इंग्रजी भाषेत सुमारे ९०० मौलिक (basic) भारतीय शब्द सर्रास वापरले जातात व त्यापासून साधलेले सहस्रावधी शब्दही इंग्रजी म्हणून ओळखले जातात. ही संख्या साहजिकच परिस्थितीनुरूप कमीअधिक होत राहील. विल्सनच्या कोशात तत्कालीन इंग्रजीत आढळणाऱ्या २६००० भारतीय शब्दांची नोंद झाली आहे! आता या भारतीय शब्दांचा समाचार घेऊ.

सन १६०० मध्ये पहिल्या एलिझाबेथच्या कारकिर्दीत ईस्ट इंडिया

कंपनीची स्थापना झाली, आणि 'ताम्रमुखी' माणसांनी आपली जहाजे सुवर्णभूमीच्या दिशेने हाकारली. पण असा साक्षात संबंध येण्याअगोदरही काही भारतीय शब्द सातासमुद्रापार पोचले होते. ते गेले होते ग्रीकांच्या, फिनिशियनांच्या आणि अरबांच्या जहाजातून. यांचा साकल्याने विचार केला की तेसुद्धा इतिहासाच्या खुणा सांगतात. Sugar, Camphor, Sandal, Pepper (पिप्पली), Ginger (मल्याळीमधील 'इन्जियर'), Lac (लाक्षा), हे काही आघाडीचे दूत. Rice हा शब्द भारतीयच. भाषाशास्त्रज्ञ संस्कृत 'व्रीही' मध्ये त्याचे बीज सांगतात. पश्तु व बलुची या आर्यकुलातील भाषांमध्ये आजही तांदळाला 'वरीसी' व 'बरीझी' अशी नावे आहेत. शिकंदराच्या स्वारीच्या वृत्तान्तात तांदळाचा पाश्चात्त्य वाङ्मयात प्रथम स्पष्ट उल्लेख सापडतो. हा ग्रीक शब्द 'oryza' असा आहे. त्यावरून पुढे Rice तयार झाला. अशा ज्या चिजा भारतातून पश्चिमेकडे गेल्या त्यांची नावेपण अपभ्रष्ट स्वरूपात का होईना आज तिकडील भाषांत टिपता येतात. इंग्रजांआधी बस्तान मांडून बसलेल्या पोर्तुगीजांकडून इंग्रजांनी Caste, Padre, Maistry, Ayah, Cobra, Mosquito, Cameez (खमीस) यांसारखे अनेक शब्द घेतले. हे शब्द पोर्तुगीजांनी प्रथम भारतात - त्यांना नव्याने आढळलेल्या गोष्टींसाठी वापरले होते. याशिवाय काही भारतीय शब्द भ्रष्ट स्वरूपात पोर्तुगीज वापरीत असत तेही इंग्रजीत गेले. Mango, Jack, Curry, Coir, Betel, Areca, Copra हे त्यांपैकीच. या सर्व व्यवहारात किनाऱ्यालगतच्या भारतीय भाषांनीसुद्धा आपल्या शब्दभांडारात भर घातली. गोवेकरांकडून आपण चावी, बादली, लिलाव, बटाटा, साबण असे कित्येक शब्द उचलून अल्पावधीत त्यांना 'घरेलू' केले.

सुरुवातीसुरुवातीस इंग्रज अधिकाऱ्यांनी आपल्या खलित्यामध्ये भारतीय शब्दांचा मनमुराद वापर केला. 'कुंपणी' सरकारचे हे अधिकारी विलायतेतील आपल्या वरिष्ठांवर वजन पडावे म्हणून एतद्देशीय भाषेचे ज्ञान पत्रव्यवहारात अशा तऱ्हेने मिरवीत असत. प्रारंभीची दीडशे वर्षे हा खाक्या चालू होता म्हटले तरी चालेल. पुढे कंपनीच्या लंडनमधील सूत्रधारांनी हताश होऊन हुकूम सोडला, की निरुपाय असेल तरच नेटिव्ह शब्द वापरावेत! जित जनांकडून होणारी ही शाब्दिक कुरघोडी या मंडळींना मानवेना, त्यामुळे पण बरेच शब्द बाहेर पिटाळण्यात आले.

इंग्रजीतील भारतीय शब्दांचा दोन दृष्टिकोणांतून विचार केला पाहिजे :






(१) हे शब्द इंग्रजीत कितपत सामावले गेले; आणि (२) त्यांचा उपयोग त्या भाषेत कोणत्या प्रमाणावर केला जातो. Oxford English Dictionary ने या परकीय शब्दांचे तीन वर्ग कल्पिले आहेत : (१) पहिला वर्ग 'naturals' चा. आपण त्यांना 'घरजावई' म्हणू. हे शब्द इंग्रजीशी एकरूप झाले. भारतीयांखेरीज अन्य लोकांना तर मुद्दाम सांगितल्याशिवाय ते भारतीय शब्द आहेत असे कळणारच नाही, पण काही वेळा आपणासही भ्रांत पडते की हा शब्द इंग्रजीतून तर नाही मराठीत आला! उदा. Lac, Doot, Bacoit, Jungle, Bazaar, Bunglow इ. (२) दुसरा वर्ग Aliens किंवा Denizens चा. हे 'अतिथि' शब्द. ते इंग्रजीत वापरले गेले तरी त्यांचा भिन्न तोंडवळा अजून लक्षात असल्याने त्यांना पूर्ण इंग्रजीचा दर्जा मिळाला नाही. सतत आणि सहजपणे वापरात राहिले तर ते पहिल्या वर्गात चढतील, मागासले तर तिसऱ्या वर्गात ढकलले जातील. Buksheesh, Seapoy असे शब्द अजून याच इयत्तेत आहेत. (३) तिसरा वर्ग 'Casuals' चा. हे उपरे किंवा आगंतुक शब्द. प्रवास-पर्यटनांच्या हकीकती, तत्त्वज्ञानावरील ग्रंथ, इतिहास, समाजशास्त्र यांतून आढळणारे एतद्देशीय शब्द. हे सर्वसाधारण वाचकांना समजावून सांगितल्याशिवाय समजण्यास कठीण असतात. आज आहेत. उद्या असतील किंवा नसतीलही अशी स्थिती असणारे हे शब्द. भाषाप्रवाहाच्या पृष्ठभागावर हे शब्द सारखे तरंगत असतात. त्यांपैकी काही शब्दच त्या प्रवाहाशी समरसून जातात.

या सर्व शब्दांचा उपयोग इंग्रजीत कितपत केला जातो याची तपासणी केली म्हणजे असे आढळते की, काही मोजक्या लेखकांनीच मुद्दाम, हेतुपूर्वक व समजून घेऊन हिंदी शब्द वापरले आहेत. बऱ्याच जणांच्या लिखाणात ते नकळतच आले आहेत. चॉसर, मॉर्लो किंवा शेक्सपीयर यांनी Beryl, Camphor, Candy, Musk, Malabathrum, Panther असे शब्द चपखलपणे वापरले आहेत. हॉकिन्स, रो, फिंच, फ्रायर, हॅमिल्टन इत्यादी प्रवाशांच्या लिखाणात असे अनेक शब्द स्वकीय शब्दाएवढ्याच सहजतेने वापरलेले आढळतात. विशेषतः डॉ. जॉन फ्रायरच्या A New Account of India and Persia या ग्रंथात हिंदी शब्दांची खैरात झाली होती. Bohra, Chitti, Dubashi, Ghary, Maharajah, Mongoose, Moosal, Naik, Sarposh, Tandel असे कित्येक शब्द त्याने लोकप्रिय केले. या पुस्तकावरूनच पुष्कळ इंग्रजांनी त्या काळी हिंदुस्थानची ओळख करून घेतल्यामुळे ते शब्द लोकांपुढे सतत राहिले व

रूढ होऊ लागले. मिल्टन, ड्रायडनप्रभृती कवींनी भारतीय संदर्भात भारतीय शब्दच हौसेने वापरले व ते रूढ झाले.

अठराव्या शतकात रॉबर्ट ऑर्म आणि एडमंड वर्क हे हिंदी शब्दांचा मोठ्या प्रमाणावर वापर करून गेले. त्या वेळी अर्काटचा वेढा, अंधारकोठडी प्रकरण, प्लासीची लढाई आणि हेस्टिंग्स्वरील खटला या गोष्टींमुळे भारतीय घडामोडींविषयी उत्सुकता शिगेला पोहोचली. अतिरंजित लिखाणास ऊत आला. त्यामुळे नव्या हिंदी शब्दांचा इंग्रजी लोकांना परिचय झाला. बर्कने अर्जी, कबुलायत, दस्तक, अम्मल, जहागीर, नवाब, सुभा, दरबार, वकील, नजराणा, चौकी वगैरे शब्द पुनः पुन्हा वापरले. डॅनियल डीफो, ॲडिसन, गिबन, होरेस वालपोल, लॉरेन्स स्टर्न यांच्या वाङ्मयातही असे शब्द मिळतात. यानंतर सर विल्यम जोन्स, हेन्री कोलब्रुक यांच्यासारखे विद्वान संस्कृतचा अभ्यास करू लागले. त्या वेळी हिंदी शब्द हे इंग्रजीत अतिशय भोंगळपणे लिहिले जात असत. 'महाल' हा शब्द Mal, Maal, Mehal, Mahl, Mehaal, Mehaul, Mhal व Mohaul एवढ्या तऱ्हांनी लिहिलेला आढळतो. ही अनागोंदी सुधारण्यासाठी सर चार्लस् विल्किन्स, हालहेड वगैरे पंडितांनी शब्दाचे योग्य उच्चार दाखविण्यासाठी काही खुणा वापरण्यास सुरुवात केली. सर विल्यम जोन्सने वापरलेली उच्चारनिदर्शक चिन्हांची पद्धत पुढे रूढ झाली आणि थोड्याफार फरकासह आज तीच रूढ आहे. या नियमनामुळे मूळ भाषेतील उच्चाराबरहुकूम इंग्रजीत 'स्पेलिंग' करणे सोपे झाले.

एकोणिसाव्या शतकात सर वॉल्टर स्कॉटने 'The Surgeon's Daughter' ही भारतीय पार्श्वभूमीवरील कादंबरी लिहिली. स्कॉटने भारतीय शब्द सढळपणे वापरले. उत्तरायुष्यात त्याचे लक्ष इकडे वळले. त्या अभ्यासाने तो भारतावर इतका लुब्ध झाला की, India is the true place for a Scott to thrive in' असे मजेदार वाक्य त्याने या कादंबरीच्या प्रस्तावनेत लिहिले आहे! राजपूत, पेटा, काफिला, दिवाण, सरदार, वकील, किल्लेदार, स्वार, सिपाही, नगारा, हौदा, चबुतरा, चवरी अशा शब्दांची त्यात रेलचेल आहे. अधिक वास्तवतेच्या भरीस पडून त्याने वाक्प्रचारही आपल्याकडील वापरले. उदा. या कादंबरीतील रिचर्ड मिडल्मस् आपल्या प्रेयसीला उद्देशून My Juliet असे न म्हणता 'My Nourgehan, My Moti Mahal' असे बोलताना दाखविले आहे! रॉबर्ट साऊदेने 'The Curse of Kehama' म्हणून एक मोठे काव्य रचले. त्याची








पार्श्वभूमी व विषय भारतीय आहेत. यात स्वर्ग, देवता, सुर, असुर, अमृत, जंगल, पैदल, योगी असे शब्द आले आहेत. परकीय शब्दांना मोडून-मुरडून इंग्रजी धाटणीचे करण्याची साऊदेला सवय होती. 'गंधर्व' हा शब्द त्याने 'Glendoveers' असा बदलला! लॉर्ड वायरन्च्या काव्यात इतर भारतीय शब्दांसमवेत अत्तर, बिस्मिल्ला, बुलबुल, गुल, होरी, पिलाव, सलाम, सुलतान असे शब्द नव्याने आले. कलकत्त्यात जन्मलेल्या थॅकरेने आपल्या सर्व कादंबऱ्यांतून अक्षरशः शेकडो हिंदी शब्द वापरले आहेत. काही वेळा हे शब्द त्याने मिस्कीलपणे वापरले आहेत. त्याच्या काही पात्रांची नावे मि. चटनी, जनरल सर, राईस करी, मिस् ताडी, लेडी मेरी, मँगो, मिस् बुलबुल, कॅ. बँगल्स, कर्नल गोल्डमोहोर अशी आहेत! भारतात जन्मला असला तरी त्याचे भारताविषयीचे ज्ञान स्नेह्यासोबत्यांकडून आणि पुस्तकांतून मिळविलेले होते. याउलट नोबेल पारितोषिक पटकाविणारा रुडयार्ड किपलिंग लहानपणापासून इथे वाढलेला. लहानपणी त्याला स्वप्नेसुद्धा हिंदीत पडत असत! १८८२ मध्ये पुन्हा भारतात आल्यावर त्याने इथल्या जीवनाचे निरीक्षण केले. त्याने जेवढ्या सहजतेने आणि समर्पक रीतीने हिंदी शब्द वापरले तेवढे अन्य लेखकांनी क्वचितच वापरले असतील. त्याने नवे शब्द प्रचारात आणलेच पण जुन्या शब्दांनासुद्धा त्याच्या लिखाणात नवा रंग, नवी डूब मिळाली. उत्तर भारतीय शब्दांवर त्याचे प्रेम फार होते. आणि निदान कादंबरीतील एका पात्राकरवी तरी त्याने दक्षिण भारतीय शब्दांबद्दल नापसंती व्यक्तविली आहे. त्याच्या सर्वच शब्दांना इंग्रजीत जीवदान मिळाले असे मात्र नाही. शाबाश, कैदी, एकदम, जलदी, जादू, इज्जत हे त्याने अनेक वेळा वापरलेले शब्द आज इंग्रजीत वापरत नाहीत. हिंदी जाणणाराला त्याच्या कविता त्यातील शब्दांच्या खिचडीमुळे चटकदार वाटत असतात.

किपलिंगनंतर फॉर्स्टर व थॉमसन यांनी भारतीय जीवनावर लिहिले. फॉर्स्टरची 'A Passage to India' ही कादंबरी गाजली. 'Fielding wasn't Pucca' किंवा 'increasing the izzat' असे शब्दप्रयोग त्याने वापरले. थॉम्पसनच्या 'An Indian Day' मध्ये अँग्लो-इंडियन समाजातील काही मिश्र वाक्प्रचार आढळतात. उदा. 'Jao jaldily', 'be choop about it' इ. ललित लेखकांप्रमाणेच मोनियर, विल्यम्स, विल्सन, मॅक्समुल्लर, ग्रँट डफ, एल्फिन्स्टन्, टॉड वगैरेंच्या लिखाणातूनही भारतीय शब्द लोकांसमोर येत होते. राजेमहाराजे आणि अमीरउमरावांचे जग, शिकारी, नाचतमाशे, पोलोसारखे खेळ, गिर्यारोहण

वगैरे गोष्टींशी पण इंग्रजांचा संबंध अधिक आला व त्यांतील खास शब्द इंग्रजीस चिकटले.

पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धांत काही चांगल्या इंग्रजी लेखकांचा भारतीय सैन्याशी आणि जीवनाशी संबंध आला. डेनिस ग्रे स्टोल किंवा सेसिलि लेस्ली यांच्या कादंबऱ्यांत तत्कालीन प्रचलित शब्द आढळतात. स्वातंत्र्यानंतर तर भारतीय जीवनाविषयी कुतूहल अपार वाढले आणि तद्विषयक कविता त्यातील शब्दांच्या खिचडीमुळे चटकदार वाटत असत. पुस्तकांचे पेवच फुटले. ॲलन मूरहेड, फिलिप, वुड्रफ, जॉन मास्टर्स, इलियट, हक्स्ले, फिशर असे अनेक लेखक हिंदी शब्द वापरीत आहेत. १८५७ च्या स्वातंत्र्य समराच्या शताब्दिनिमित्त इंग्रजीत ५-६ कादंबऱ्या व अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले; त्यांत हिंदी शब्द आले. याशिवाय नेपाळ, तिबेट, भूतान या प्रदेशांवर इंग्रजीत बरीच पुस्तके झाली. त्यातही काही भारतीय शब्द येत गेले. या इंग्रज लेखकांबरोबरच विसाव्या शतकात रवींद्रनाथ टागोर, राधाकृष्णन, सरोजिनी नायडू, गांधीजी, जवाहरलाल, मुल्कराज आनंद, आर.के. नारायण, कमला मार्कण्डेय, ऑब्रे मेनन, खुशवंतसिंग, शान्ता रामराव, आर्थर लाल असे कितीतरी लहानमोठे लेखक इंग्रजीत लिहू लागले. यांच्याप्रमाणेच भारतातील सर्व प्रदेशांत वृत्तपत्रव्यवसायातही इंग्रजी वृत्तपत्रांनी मोठी कामगिरी केली. त्यामुळे नवे नवे शब्द इंग्रजीस मिळत गेले. आजकाल तर भारताविषयी जगात सर्वत्र विलक्षण कुतूहल आहे. प्रत्यही नवी पुस्तके लिहिली जात असून त्यातून नवे शब्द प्रसृत होत आहेत. भूदान आंदोलनाचीच गोष्ट घ्या. 'भूदान', 'सर्वोदय', 'ग्रामदान' हे शब्द परदेशात पोचलेसुद्धा! या आंदोलनाच्या स्थैर्यावर या शब्दाची शाश्वती अवलंबून राहील. येथवर थोडे वाकडे वळण घेऊन इंग्रजी साहित्यातील भारतीय शब्दांचा हा आजतागायत पण धावता आढावा घेतला. आता कोणत्या काळात कोणते शब्द तिकडे गेले यातील संगती शोधण्याचा प्रयत्न करू.

**भाषिक दत्तविधान**

कालानुक्रमाने मागोवा घेतला म्हणजे त्या त्या काळातील शब्दनिर्यातीवर स्थूलमानाने तत्कालीन परिस्थितीचा ठसा आढळतो. सतराव्या शतकातील शब्द तपासले तर असे आढळते, की इंग्लंड आणि भारत यांच्यातील सुरुवातीचे संबंध सलोख्याचे होते. पोर्तुगिजांचे बस्तान पक्के झाले होते, मोगल राजवट भरभराटीस चढली होती आणि इंग्रजांनी व्यापाराच्या निमित्ताने चंचुप्रवेश करून हालचाली सुरू

केल्या होत्या. या शतकात इंग्रजीत गेलेले भारतीय शब्द व्यापारधंदा दाखविणारे आहेत, भारतातून निर्यात होणाऱ्या वस्तूंचे निदर्शक आहेत. यांनाच इंग्रजीत Contact Words म्हणतात. Calico, Chintz, Tussore, Bengal, Palampore, Dungaree, Amdavat यांसारख्या कापडाच्या जाती त्यांच्या मूळ बाजारपेठांच्या नावाने ओळखल्या जाऊ लागल्या. प्रथम प्रथम सर्व युरोपात सगळ्या तऱ्हांच्या हिंदी कापडांना फक्त Calicoच म्हणत. या 'कॅलिको' शब्दांची मुलुखगिरी मनोरंजक वाटावी. कालिकत या केरळ किनाऱ्यावरील बंदरातून निर्यात होणाऱ्या कापडाला प्रथम हे नाव पडले. पुढे इंग्लंडात हे कापड लोकप्रिय झाले, त्याचे कपडे घालणे ही फॅशन झाली. Calica ball म्हणून एक खास नाचाचा कार्यक्रमसुद्धा वरच्या वर्गात प्रिय झाला. या कार्यक्रमाच्या वेळी सर्व निमंत्रित स्त्रीपुरुषांना या 'कालिकत' कापडाच्याच पोशाखाचे बंधन असे, पण पुढे अधिक चांगले, तलम कापड भारतातून जाऊ लागल्यावर या शब्दाचे नशीब फिरले. 'Calico Ball' चा अर्थही 'खालच्या दर्जाचा, दरिद्री नाच' असा उलटला. अमेरिकेतसुद्धा 'छापील सुती कापड' या अर्थाने 'Calico' शब्द रूढ झाला आणि अमेरिकेतील लोकभाषेत (Slang) "Oh! She's a Calico!" असे सुंदर मुलीबद्दल म्हटले जाऊ लागले! फ्रान्समध्ये त्याला निराळेच वळण मिळाले. 'Calicot' या फ्रेंच शब्दाचा अर्थ 'शिंप्याचा मदतनीस' असा आहे! 'सुरत' हा शब्दही प्रथम चांगल्या कापडासाठीच वापरण्यात आला. नंतर त्याचेपण पारडे फिरले. 'कमकुवत, भेसळ असलेले कापड' असा अर्थ त्याला आला. एवढेच नव्हे तर 'भेसळ असलेले' एवढ्याच अर्थाने 'Surat' हा शब्द वापरला जात होता. एका उंची मद्याच्या कारखानदाराने त्याच्या दारूस 'Surat brew' (सुरती काढा) म्हटल्याबद्दल एका इसमावर अब्रुनुकसानीची फिर्याद केल्याचा उल्लेख सापडतो! bania, borah, shroff, coolie, bazaar, rupee, pice, mohur, seer, tola, maund वगैरे या शतकातील शब्द स्पष्टपणे व्यापारी संबंध दर्शवितात. Topass हा इंग्रजी शब्दसुद्धा असाच मनोरंजक आहे. त्याचा आजचा अर्थ, जहाजावरील सांगकाम्या, भंगी असा आहे. त्याचे मूळ पोर्तुगीज अमलात निघते. पोर्तुगीज सैनिकांच्या एतद्देशीय संबंधामुळे एक नवीन जात निर्माण झाली होती. या लोकांना देशी आणि पोर्तुगीज या भाषा कामापुरत्या बोलता येत. त्यामुळे जहाजावरती हलकी कामे करून वेळप्रसंगी ते 'दुभाष' म्हणूनही उपयोगी पडत. हे 'दुभाष' नाव त्यांना कायमचे चिकटले. मूळ अर्थ मात्र पार लोपला. दुसरा

'फिरंगी' हा शब्द. तो 'Frank' वरून आला हे उघड आहे. भारतीयांनी त्या काळात तो सर्रास गोऱ्या लोकांसाठी वापरला.· डिंगमार, वलंदेज, फराशी, टोपीवाले, वगैरे शब्दांनी भिन्न भिन्न युरोपीयनांचा निर्देश झाला तरी 'फिरंगी' हा शब्द सैलपणे सर्वांसाठी वापरण्यात आला आणि खुद्द इंग्रजांनीही तो त्या अर्थी वापरलेला आढळतो. पुढे त्यातील तिरस्कार त्यांना जाणवला असावा. इंग्रजीतून त्याची हकालपट्टी झाली. दक्षिण भारतीय भाषांत 'फिरंग' हा शब्द तोफ या अर्थाने रूढ आहे. कारण सांगावयास हवे? याच शतकात पोर्तुगिजांकडून इंग्रजांनी मल्याळी भाषेतील शब्द उचलले. ते आजही रूढ आहेत. उदा. Betal, areca, coir, copra आणि jack. मोगल साम्राज्याशी सबंध दाखविणारे शब्द म्हणजे फर्मान, दरबार, मुनशी, गुमास्ता, फकीर, खिदमदगार, चौकी, कचेरी, महाल, डोली वगैरे. कोणाही वैभवशाली व्यक्तीला The great mogul म्हटले जाऊ लागले. आजही इंग्रजीत 'mogul' हा शब्द त्याच अर्थाने वापरतात. उदा. चित्रपटधंद्यातील श्रेष्ठ निर्मात्यांना Movie moguls म्हणतात. Hobson-jobson व jaggernaut हे शब्दप्रयोग याच काळातले. hobson-jobson हा शब्द Yule आणि Burnell या विद्वानांनी इंग्रजी भाषेतील भारतीय शब्दांचा जो खास कोश तयार केला त्यासाठी अन्वर्थक ग्रंथनाम म्हणून निवडला. या कोशामुळे हिंदी शब्दमिश्रित इंग्रजीला आजही Hobson Jobson म्हणतात. मोहरमच्या दिवशी मुसलमान लोक डोले मिरवितात व त्यापुढे 'हाय हुसेन! या हसन!!'असा आक्रोश करतात. याच क्रंदन शब्दांचे इंग्रजीत Hobson Jobson झाले. (आपल्या 'हैदोस धुल्ला' शब्दाचे मूळ इथे वाचकांना आठवत असेल. 'हाय दोस्त! दुलाहा वेधूला!' हाही मोहरममधील आक्रोश आहे. नुकताच नवरदेव (दुलाहा) झालेला हुसेन मारला गेला. त्याचेच दुःख मोहरमच्या दिवशी पाळतात. या सामुदायिक शोकप्रकटनात कित्येकांच्या भावना अनावर होतात. त्यामुळे मराठीत आज त्या शब्दाला अनावर, असंयत गडबड असा अर्थ आला आहे.) Jaggernaut हा शब्द 'जगन्नाथ' चा अपभ्रंश. पुरी येथील जगन्नाथाच्या रथयात्रेपुढे मुक्ती मिळविण्याच्या हेतूने अनेक भाविक हिंदू आत्मसमर्पण करीत असे म्हणतात. इंग्रज प्रवाशांत असल्या रिवाजाबद्दल कुतूहल फार. त्यामुळे या घटनेची वर्णने केली गेली आणि रणगाडा, वरवंटा, समूळ चिरडणारी शक्ती अशा अर्थाने तो शब्द रूढ झाला. उदा. Jaggernuaut of dictatorship म्हणजे 'हुकूमशाहीचा वरवंटा.'



अनुक्रमणिका








पुढे अठराव्या शतकात हा शब्दांचा ओघ मंदावला. अगदी शेवटी शेवटी पुन्हा शब्द जाऊ लागले. जे शब्द आधीच वापरात होते. त्यांना वाकवून, वळवून, इंग्रजीच्या शब्दभांडारात ठीक बसतील असे करण्याकडे प्रयत्न आढळतो. नव्या अर्थच्छटा त्यांना चिकटताना आढळतात. अठराव्या शतकात इंग्रजांनी बराच काळ आपली घडी पक्की बसविण्यात घालविला. त्यामुळे त्यांच्या हालचाली मंदावल्या आणि पत्रव्यवहार, लेखन वगैरेंवरही त्याचा परिणाम झाला असणे शक्य आहे. या काळातील काही प्रमुख शब्द म्हणजे Jute, Kincob, Cassemere, Dustak. दस्तक म्हणजे दस्तखत, स्वाक्षरी. मोगल बादशहांनी इंग्रजांना दिलेल्या परवान्यांना उद्देशून हा शब्द प्रचारात आला. पुढे इंग्रजी वखारीतून पण 'दस्तक' देण्यात येऊ लागले. पुढे पुढे 'पासपोर्ट' अशाही अर्थाने तो शब्द वापरात होता. देशी शब्द आणि इंग्रजी शब्द जोडून अर्थ व्यक्त करणारे शब्दसुद्धा या काळात पुढे आले. उदा. *Paddy*-bird, *Jute*-carpet, police-*chokwy*, *Cot*-frame, *Lacquer*- worm, *Hookah*-bearer, *Tussore*-worm इत्यादी. त्याचप्रमाणे Indianize, laccate (lac पासून) अशी क्रियापदे किंवा Nobobish, nobobry, noboness असे शब्द साधण्यात आले. 'Islam' म्हणजे मुसलमानी धर्म! पण त्याला पुन्हा 'ism' प्रत्यय लावून 'Islamism' हा शब्द वापरलेला आढळतो. ('अंमलदार' नाटकातील 'नर्व्हस-नेसपणा' सारखाच काहीसा हा प्रकार!) 'कुडते' या अर्थी 'Bunianjacket' (म्हणजे बनिया लोकांचा अंगरखा) हा शब्द वापरण्यात आला. कालांतराने 'जॅकेट' काढून टाकले आणि 'बनियन' म्हणजे 'अंगरखा' हा शब्द रूढ झाला. असाच Loot हा शब्द. शिपायांच्या फौजांबरोबर एक बाजारबुणग्यांची सेना असे. हे लोक लढणारे नसत. फौजेला रसद पुरवीत आणि लढाई थांबली की साधेल त्याप्रमाणे हात धुऊन घेत. यांना 'लोटीवाले' (Lootiwallah) म्हणत. या शब्दावरूनच loot शब्द आला. कर्नाटकात हैदरशी झालेल्या लढायांच्या तत्कालीन वृत्तान्तात या लोटीवाल्यांचा निर्देश आहे. सत्तावनच्या उठावणीत हे होते. याच काळात इंग्रजांनी आपल्या शिबंदीची पुनर्रचना केली. तेव्हा Sheebundee, reesalah, teling, subedar, jamadar, havildar, naik हे शब्द इंग्रजीत गेले. Hookah, cheelum, howdah keddah हे शब्दही सैन्यातूनच अधिक प्रचारात आले.

एकोणिसाव्या शतकातील महत्त्वाचा शब्द म्हणजे 'khaki!' आज जगभर तो रूढ आहे. Gymkhana, jaikhana, memsahib, competitionwallah

असे गंगाजमनी शब्दही याच काळातील. wallah हा प्रत्यय जोडून नवे नवे शब्द हवे तसे बनविण्याची वृत्ती बोकाळली. भंग्याला Sanitary-wallah आणि पाद्रीबुवांना 'Amenwallah' म्हणू लागले! Loot, Nautch, Curry, Toddy, Jaggernaut, Tom-tom ही नामे क्रियापदे म्हणूनही वापरण्यात आलेली आढळतात. 'दाम करी काम' या आपल्या म्हणीत शिल्लक असलेले 'दाम' हे हलके नाणे या वेळी प्रचारात होते. यावरूनच 'To care a farthing' किंवा 'To care a tuppence' च्या धर्तीवर 'To care a damn' असा वाक्यप्रचार भाषेत आला. आजकालच्या 'I don't care a damn' मध्ये तोच वाक्प्रचार रूढ आहे. वर्णामध्ये 'ब्राह्मण' श्रेष्ठ मानला जाई. इंग्रजीत हा शब्द श्रेष्ठ श्रेणीचा निदर्शक म्हणून वापरला गेला. 'कुलशीलवान' या अर्थी जुन्या इंग्रजीत हा वापरला होता आणि अमेरिकेतील आजच्या Boston Brahmin या वाक्प्रचारात त्याचाच अवशेष सापडतो. याच शब्दापासून Brahmanism, Brahmanicide (ब्रह्महत्या), Brahmanism असे शब्दपण साधण्यात आले. संस्कृत साहित्य आणि तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासामुळे Karma, Maya, Dharma, Bhakti, Samadhi, Yoga, Nirvana, Mantra, Mukti, Puja, Sutra इत्यादी शब्द इंग्रजांनी वापरले. नेपाळशी आलेला संबंध 'गुरखा' व 'कुकरी' हे शब्द सांगतात. उत्तरेकडील फौजांत उच्चवर्णीय हिंदूंचा भरणा होता. त्यात गंगा-यमुनेच्या दुआबातील, 'पांडे' या नावाने ओळखले जाणारे बरेच ब्राह्मण होते. सत्तावनच्या समरातील हुतात्मा मंगल पांडे प्रसिद्धच आहे. नंतर कित्येक वर्षांपर्यंत बंडवाल्या शिपायांसाठी 'Pandy' हा शब्द वापरीत असत. 'डाकात' या बंगाली शब्दावरून 'Dacoit' व 'Dacoity' हे शब्द निघाले. हिंदीमध्येही 'डकैत' शब्द प्रचलित आहे. Pajama हा शब्द 'पायांत पेहरण्याचा कपडा' या अर्थी इंग्रजीत याच काळात रूढ झाला. आपल्या 'जामानिमा' 'रुजामा' वगैरे शब्दांत हा 'जामा' आहेच. Charpoy, hajri, chota peg हे शब्दपण फौजेत अगोदर रूढ झाले. Teapoy हा शब्द 'तिपाई' वरून आला. चहाचे सामान ठेवण्यासाठी जे तिपाई - छोटे मेज वापरीत त्याचेच पुढे Teapoy झाले. Tea शी त्याचा वस्तुतः संबंध नाही! 'Chotapeg'च्या ऐवजी कित्येक वर्षे Chota शब्द 'एकच प्याला' या अर्थी वापरला जात असे.

राष्ट्रीय आंदोलनाने Khilaphat, hadtal, Lathicharge, Khaddar, Svaraj, Satyagraha, Ahimsa यासारखे शब्द मिळाले. युद्धकाळात 'Blighty'

हा शब्द लोकप्रिय झाला. विलायत म्हणजे मायदेश. इथले इंग्रज अधिकारी हिंदुस्थानीत बोलत असताना 'Home' या अर्थी 'विलायत' शब्द वापरीत. पुढे त्याची व्याप्ती मर्यादित होऊन 'विलायत' म्हणजे इंग्लंड मानण्यात येऊ लागले. त्यावरून 'Blighty leave' म्हणजे 'विलायतेस जाण्यासाठी घेतलेली रजा,' 'Blighty bag' इंग्रजी धाटणीची पिशवी वगैरे शब्दप्रयोग आले. हा शब्द अजून चालू नाणे आहे. असाच दुसरा शब्द म्हणजे 'Decco'. 'देखो' या हिंदी शब्दावरून 'To have dckko in the things' 'एखाद्या गोष्टीत लक्ष घालणे' असा वाक्प्रचार आला. आज अमेरिकेतही थोड्या अर्थांतराने तो वाक्प्रचार रूढ आहे.

या भाषिक दत्तविधान संस्कारात मूळ उच्चारांत मजेदार फरक झालेले आढळतात. 'उपराज' किंवा 'युवराज' यासाठी Upper Roger या शब्दाची निवड झाली. King of Bidar ला King of Brcad म्हटले आहे. Burhanpur चे Bramport करण्यात आले. मुंबईतील पालवा बंदराचे Apploo bunder झाले. मुंबईच्या आजच्या Beach candy ला सव्वाशे वर्षांपूर्वी 'बुर्जखाडी' असे नाव होते. त्याचे Breach candy झाले आणि मग अर्थ उलगडेना म्हणून Beach candy असे ठरविण्यात आले. यावर ताण मद्रासला झाली आहे. मद्रास शहरात (मद्रासचे पूर्वीचे नाव चेन्नपट्टण; इंग्रजांनी तेथे Fort of George मध्ये विद्यालय - 'मद्रसा' काढले. त्यावरूनच 'मद्रास' म्हणू लागले.) हॅमिल्टन ब्रिज म्हणून एक ठिकाण आहे. त्याचे लोकभाषेत 'अंम्टन ब्रिज' असे झाले. पण 'अंबटन्' या शब्दाचा तामिळमध्ये 'न्हावी' असा अर्थ होतो. तेव्हा बरीच वर्षे अंबटन ब्रीज म्हटल्यामुळे शेवटी इंग्रजी पाटीसुद्धा Barber's bridge' अशी केली होती!! (दिल्लीतील Thc Ridge Road चे धीरज रोड झाल्याचेही उदाहरण आहे!) अशाच प्रकारे अलाहाबादसाठी Isle of Bat, संजाणासाठी St. John, Brinjal साठी Brown Jolly असे गमतीदार बदल करण्यात आले. रणरणत्या उन्हाची धग चुकविण्यासाठी उत्तरेत गवताची शिप्तरासारखी टोपी वापरतात. तिला शोला टोपी म्हणत. (शोला = आग) त्याचेच इंग्रजीत 'Solar Topee' झाले आणि सूर्याचे ऊन चुकविण्यासाठी वापरण्याची टोपी (sunhat) असा त्याचा अर्थ सांगितला जाऊ लागला! सिराज-उद्दौलासाठी Sir Roger Dowler असे नाव शोधण्यात आले आणि शाह शुजाउल् मुल्कसाठी Cha, Sugar and Milk!! (आपल्याकडेसुद्धा Maxmuller. Hurbert Spencer किंवा Constable यांची मोक्षमल्ल, हरभट पेंडसे किंवा गणेश टेबल अशी रूपे झाली होतीच!) मूळ

भाषेतील वचने, लिंगे वगैरेंचे नियम न लावता इंग्रजीत शब्द बनत. 'चिठी' बरोबर वापरताना आपण 'कच्ची चिठी' म्हणू. पण इंग्रजीत 'kutcha chit' म्हणतात. To Bannow (बनाना), To lugow (लगाना), To sumjow (समझाना) असे क्रियापदी प्रयोगही झाले. अर्थात ते अल्पजीवी ठरले. चंपी वरून 'Shamppo' शब्द आला. त्याचे मात्र 'To shampoo' हे क्रियापद अजून कायम आहे. Average हा शब्दसुद्धा मूळ इंग्रजी नाही. अरब व्यापारी जहाजांवरून मालाची ने-आण करीत. त्यातील काही मालात हवेमुळे बिघाड (आवारा) होई. या खराब मालाचे सर्व चांगल्या मालाशी प्रमाण बसवून त्याप्रमाणे दर आकारला जाई. यालाच Average म्हणण्यात येई. पुढे तो 'सरासरी' या अर्थी रूढ झाला. 'बंगला' म्हणजे बैठे घर. पण आज A two storeyed Bunglow' असा शब्दप्रयोग कोणी चूक मानीत नाही. Betel या शब्दाचा मूळ मल्याळी अर्थ 'नागवेलीचे पान' पण 'इंग्रजांनी पानाबरोबर खावयाचे फळ' या अर्थी सुपारीला Betelnut हा शब्द तयार केला. सुपारीसाठी असलेला दुसरा शब्द Areca हाही केरळमधीलच. (आपल्या 'अडकित्ता' शब्दात तो आढळतो.) 'पाराया' म्हणजे दक्षिणेत 'चांडाळ'. इंग्रजीत 'बेवारशी, निकृष्ट, तिरस्कृत' अशा अर्थी तो रूढ आहे. उदा. भटक्या कुत्र्याला Pariah dog म्हणतात. याप्रमाणे उदारहणे द्यावी तेवढी थोडीच आहेत. 'अनंत पारं किल शब्दशास्त्रम्' म्हणतात ते सत्यच आहे. आपला इंग्रजांशी ज्या प्रमाणात संबंध आला त्या प्रमाणात स्वाभाविक तेवढी भर इंग्रजी भाषेत पडली. आपल्या भाषांतही इंग्रजी शब्द येत होते. त्यांच्या हकालपट्टीसाठी चळवळीपण झाल्या. आजकालच्या युगातच नव्हे तर अव्वल इंग्रजीच्या काळात 'न वदेद्यावनीभाषां प्राणैः कण्ठगतैरपि' या परंपरेत वाढलेल्या शास्त्रीमंडळींनीपण आपला सोवळेपणा कायम राखण्याचा प्रयत्न केला. आमच्या शास्त्रीमंडळींनी सव्वाशे वर्षांपूर्वी रचलेल्या कोशाच्या प्रस्तावनेतील पुढील उतारा पाहा : "या देशीचे राज्य पूर्वी कितीएक वर्षे यवनांनी केले. त्यामुळे यवनी भाषेतील दर, तयार, रोज, सालगुदस्त इत्यादी कितीएक शब्द या भाषेत मिसळले आहेत. ते राजकीय व्यवहाराचे अनुरोधाने आले असून राजकीय व्यवहारीच प्राधान्ये करून वर्ततात आणि तेथेच शोभतात. इतर साधारण व्यवहारी सरासरी बरे दिसतात, परंतु शास्त्रीय व्यवहारासंबंधी प्रौढ म्हणून जी भाषा तीत तर अगदीच शोभत नाही. याकरिता प्रौढ भाषेत ते शब्द येऊ नयेत." पण लोकभाषा आपल्या कोंदणात बसतील अशी सारी शब्दरत्ने गोळा










करीत असते. अगदी प्राचीन काळापासूनचे दाखले याबाबत मिळतात. अथर्ववेदात अ-संस्कृत शब्द अधिक हे एक कारण त्याला 'त्रयी' मध्ये स्थान न मिळण्याचे होते. परंतु केवळ परकीय आणि अनाकलनीय म्हणून असे शब्द त्याज्य मानू नयेत असे जैमिनीसारख्यांनी सुचविले होते. जैमिनीचे 'म्लेंच्छप्रसिद्धार्थप्रामाण्याधिकरण सूत्र' या संदर्भात बरेच महत्त्वाचे आहे असे वाटते.

केवळ एका मनोरंजक विषयाची ओळख करून देण्यासाठी हा निबंध लिहिला असल्यामुळे 'भाषाशुद्धी' विषयी चर्चा करणे विषयाला सोडून होईल. पण वरील विवेचनावरून ध्यानात येईल, की इंग्रजांनी नवीन शब्दांना आपलेसे करण्यात कसूर न केल्यामुळे आज त्यांची भाषा समृद्ध झाली आहे. डॉ. सुब्बाराव यांच्याच शब्दांत सार सांगावयाचे म्हणजे ' They (Indian words) have not left so deep or wide a mark on the English vocabulary as to maodify its character. They are to the language what curry and Pilav are to the daily fare-not absolutely indispensable but certainly delicious and desirable.'

**अधिक माहितीसाठी -**


१) Indian words in English G. Subba Rao. Oxford, 1954
२) A History of Foreign Words In English - Mary S. Serjeantson, London, 1935
३) A Glossary of Judicial and revenue terms and of useful words etc. - H.H. Wilson, Rev.Ed (Calcutta. 1910)
४) Hobson-Jobson-Col. Henry Yule and A.C. Burnell, Rev. Ed. (London, 1903)
५) Origins - Eric Partridge.
६) महाराष्ट्र शब्दकोश,खंड १ ते ७ दाते-कर्वे
७) व्युत्पत्ती कोश - कृ.पां. कुळकर्णी.


■


**'सुखिया' ए - २८, श्री आदर्श सोसायटी, कमलानगर,**
**माधवपुरा पार्क, आजवा रस्ता, बडोदा - ३९० ०१९**



**('संकलन' प्रेस्टीज प्रकाशन, पुणे १९८५ - या ग्रंथामधून साभार प्रसिद्ध)**









# भारतीय माणसाच्या शोधात भारतीय भाषा

र. कृ. जोशी

अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः क **ख** ग घ ङ च छ ज झ ञ ट ठ ड ढ ण त थ द ध न प फ ब भ म य र ल व श ष स ह ळ क्ष ज्ञ

बारा स्वर आणि छत्तीस व्यंजनं फक्त.
पण ती मागं पुढं आलटून पालटून लिहिली गेली,
की बरचसं काही सांगून जातात, मराठीत.
ज्ञानेश्वरांच्या हाती ती ओवी बनतात
तुकोबाचे अभंग हीच अक्षरे गातात
एकनाथी भारूड त्यातच वहावत जातं
टिळकांची सिंहगर्जना, चिपळूणकरांची निबंधमाला
केतकरांचे ज्ञानकोशी भांडार नि केशवसुतांची तुतारी
यातूनच अवतरते.
खांडेकरांची ययाति नि बहिणाबाईची महति
यांतूनच तर कळते
मर्ढेकरांचा सौंदर्यविचार नि अत्र्यांचा विनोद
यातूनच बहरतो
खानोलकरी नायिका चवताळलेल्या वाचल्या जातात
यातूनच, यातूनच
पुशिरेग्यांची कविता उमललेली भावते
पुल यातच हसतात - हसवतात
अर्धसत्याला वाचा फुटते यामधूनच
सुर्व्यांचे ते विद्यापीठ बनतात तर पवारांचे बलुतं
नामदेव साळुबाई ढसाळ असं पूर्ण नाव यातच लिहिलं जातं
अशी अक्षरं, असे शब्द, अशी वाक्य गवसलेली हरवलेली,
अशी भाषा, अश्या भाषा संस्कारदात्री, समृद्ध, संपन्न



अनुक्रमणिका







मराठी, पंधरापैकी एक.
बाकी सगळ्याच भाषांतून आपापल्या परीने
ज्ञानेश्वर-तुकाराम   मर्ढेकर-खानोलकर
                                   होऊन गेलेत
तेंडुलकर-पवार                 होत आहेत
मी तुम्ही आपण   हे शब्दही   आहेत
भाषा अनेक असेनात कां त्यातून
जगला जगवला जाणारा विचार तर एकच आहे की
अक्षराअक्षरांत थोडा फार फरक असेना कां
त्यानी निर्मिलेलं अक्षरब्रह्म तर एकच आहे की
शेवटी
माणूस एकच की
भारतीय .....

.... त्या भारतीय माणसाच्या शोधात भारतीय भाषा.

■

**बी-९, बकुल, महात्मा फुले सोसायटी, ६६/६७,**
**शिवस्मृती, कुर्ला (पू.) मुंबई ४०० ०२४.**

**(अशोक जैन अवॉर्डसाठी लिहिलेल्या १६ भाषांच्या जाहिरातींपैकी 'मराठी'साठी लिहिलेली जाहिरात - संपादक)**



अनुक्रमणिका

# न ऋण स्वभाषेचे फिटे

सुमन बेलवलकर

मकर संक्रांतीचा दिवस असमप्रांतात भोगाली बिहू म्हणून साजरा केला जातो. आपल्या गूळपोळीप्रमाणे तीळपिठा करून खाणे, गाणे, पाट-मुगा या श्रीमंती रेशमी वस्त्रांनी सजून समूहनृत्य करणे - असा सुंदर रीतीने हा सण साजरा केला जातो. या संक्रांतीला मी आमच्या दक्षिण क्षेत्रीय भाषाकेंद्रात, म्हैसूर मुक्कामी होते. वसतिगृहात द्राविडी भाषा शिकायला आलेल्या अहोम बंधु-बांधवींशी ओळख झाली. गोष्टी 'भूपेन हजारिकांच्या भुकु हुमहुम करे' वरून

हरिदेव दामोदर शंकर (उच्चारी होंकर) माधव ।
चारि (उच्चारी सारी) जना गुरुरूपी एक कलेवर ।

या प्रसिद्ध भजनाकडे वळल्या. चाल भजनाची असल्यामुळे मला आवडलेलं ते भजन मी म्हणत होते आणि आश्चर्य! दुसऱ्या क्षणी करुणाकान्त राय नावाचा तो उंचापुरा पत्रकार हमसाहमशी रडत माझ्या पायांवर वाकला. कोरड्या ठणठणीत विहिरीत उमाळे उसासून यावेत तसा तो ओसंडून वाहत होता. माझ्या गानकौशल्याच्या मर्यादा मला उत्तम माहीत आहेत. तो उमाळा होता घरापासून हजारो कोसांच्या अंतरावर, आठ-दहा महिन्यांच्या उपासानंतर, परक्याच्या तोंडून ऐकलेल्या स्वभाषेला पाहून! तो वाकला होता आपल्या आई-आजीच्या जिभेवर सतत असणाऱ्या शब्दांच्या पावलांवर! त्या अनुभवाची मी साक्षी झाले हा माझा भाग्ययोग!

परतीच्या प्रवासात आम्ही दोघी वातानुकूलित डब्यात सरकारी अधिकाऱ्याचा आणता येईल तेवढा रुबाब आणून बसलो होतो. बंगळूरला तसेच दोघे तगडे अधिकारी चढले. अशा ठिकाणी, अशा प्रसंगी, पुरुष सहसा परस्त्रियांशी बोलत नाहीत. पण त्यांनी आपणहून विचारलं, "आप कहाँतक जा रही हैं?" आमच्या हिंदी उत्तरांबरोबर सुरू झालेला सुखसंवाद नंतर पुण्याला येईपर्यंत चालला - इतका, की आम्हांला उतरू देऊन स्वतः आमच्या बॅगा हमालाच्या डोक्यावर ठेवून मगच









अनुक्रमणिका

त्यांनी आमची पाठवणी केली. कारण आपल्या जागेवर जरा सैलावून बसल्यावर त्या दोघा अग्रवालांमधले एक केवळ हिंदी संभाषणामुळे सुखावून म्हणाले होते, "अरे, दस दिनों से अंग्रेजी में बकबक करके ऊब गए थे यार! जीभ का जैसे स्वादही चला गया था। अब हिंदी बोल लिए तो मानो घरका खाना मिल गया।"

परदेशात, परमुलखात अगदी हिंदुस्थानी, पाकिस्तानीही केवळ एका भाषेमुळे एकमेकांच्या गळ्यात गळे घालून पक्की दोस्ती निभावत असतात. पगडी-टाय-कोट विसरून, घराच्या पडवीत नुसता पंचा नेसून उघडयाबंब अंगाने वावरण्याचे सुख अनुभवायला रँग्लर परांजपे कोकणात जायचे असे वाचल्याचे स्मरते. आपल्या भाषेचे सुख काहीसे याच जातीचे असते. स्वभाषेपासून तुटल्याच्या वेदना आणि तिच्या वातावरणात परत फिरताच येणारा मोकळा, सुखद अनुभव; ज्यांनी परभाषेला आपली मानली त्यांना कसा येणार? त्या जोडलेल्या नात्याला माती नसते - मुळं नसतात.

'म्हणून म्हणती भले न ऋण स्वभाषेचे फिटे!'

■

**एफ ४४, सुंदरनगरी, ३०८ सोमवार पेट, पुणे - ४११ ०११**

---

"माझ्या साहित्यप्रेमाचा उगमही शब्दप्रेमातच आहे........................ शब्दांवर माझं अगदी बालपणापासून खूप खूप प्रेम आहे. आजही मी सतत शब्दांच्या शोधात असते. शब्दांचं मला आजही कुतूहल वाटतं आणि माझ्या साहित्यप्रेमाचा उगमही या शब्दप्रेमातच आहे. मी खूप वाचन करीत असते. कुठलाही वाङ्मयप्रकार मला वर्ज्य नाही. संस्कृतवरही माझं खूप प्रेम आहे. पण त्याहीपेक्षा माझं प्रेम शब्दांवर आहे. बालपणापासून माझ्या कानावर तऱ्हेतऱ्हेचे शब्द पडले. मी ओव्या ऐकल्या, भिकाऱ्यांची गाणी ऐकली, लग्न समारंभातील गाणी ऐकली. माझ्या आईला, आजीला लोकगीतांची खूप आवड होती. त्यामुळे तीही गाणी कानावर पडत असत. त्या वयापासून मला शब्दांचं कुतूहल वाटत आलं आहे. ते आजही कायम आहे. तुम्ही कवी असा किंवा गीतकार, गाणे कळण्यासाठी शब्दांचा खूप उपयोग होतो. तुमच्याकडे शब्दभांडार असेल तर गाण्याच्या मागणीप्रमाणे, गाण्याच्या चालीप्रमाणे तुम्ही शब्दयोजना करू शकता आणि हे भांडार मला जसे पुस्तकांतून मिळाले तसे ते लोकसाहित्यातूनही मिळाले." असे ज्येष्ठ कवयित्री शांताबाई शेळके यांनी म्हटले आहे.

(मेहता मराठी ग्रंथजगत, जुलै २००१, पृ. ५)

■

---










# राज्य मराठी विकास संस्थेच्या दोन सूची

**राजशेखर शिंदे**

('मराठी विज्ञानवाङ्मय सूची' : संपा. रा.वि. सोवनी, रा.म.वि.सं. मुंबई २०००, पृ. ३२४, मूल्य १५०/- रु. आणि 'मराठी वैद्यक ग्रंथसूची' (१९५१ ते १९९९) संपा. डॉ. सुरेश नाडकर्णी, रा.म.वि.सं. मुंबई २०००, पृ. २८०, मूल्य १२५/- रु.)

राज्य मराठी विकास संस्थेने अत्यंत महत्त्वपूर्ण अशा दोन सूची प्रकाशित केल्या आहेत. १. मराठी विज्ञानवाङ्मय सूची, २. मराठी वैद्यक ग्रंथसूची. या दोन्ही सूचींत जानेवारी १९५१ ते डिसेंबर १९९९ या कालखंडात मराठी भाषेतून प्रकाशित झालेल्या पुस्तकांची माहिती मिळते. विज्ञानवाङ्मय सूचीमध्ये श्री. रा.वि. सोवनी यांनी 'विज्ञानलेखन : प्रेरणा आणि समस्यां'चा आढावा घेतला आहे. सुधीर थत्ते यांनी 'विज्ञान लेखनाची गरज, स्थिती आणि अपेक्षा' यावर प्रकाश टाकला आहे, तर 'वैद्यक ग्रंथसूची'त डॉ. सुरेश नाडकर्णी यांनी 'मराठीतील वैद्यकविषयक ग्रंथलेखनाचा मागोवा' घेतला आहे. या दोघांच्या चर्चेतील एक महत्त्वाचा घटक म्हणजे १९५१ पूर्वीची पुस्तके.

या दोन्ही सूचींमध्ये त्या त्या ज्ञानशाखेतील पोटप्रकारांतर्गत अकारविल्ह्यानुसार वर्गवारी लावण्यात आली आहे. 'विज्ञानवाङ्मय सूची'त इलेक्ट्रॉनिक्स, खगोलशास्त्रे, गणित, (चरित्र / आत्मचरित्र) (शास्त्रज्ञांचे), जीवशास्त्र, पर्यावरण, पशुसंवर्धन, पृथ्वी इ. पुन्हा त्या त्या प्रकारांतर्गत कोणत्या भागावर पुस्तके आहेत, हे अनुक्रमणिकेवरून कळते. उदा. पशुसंवर्धन - कुक्कुटपालन, दुग्ध व्यवसाय, पशुसंगोपन शास्त्र, पशुसंवर्धन संबंधित जोडधंदे असे. 'वैद्यक सूची'त ६९ प्रकारांवर पुस्तके लिहिली गेली आहेत, हेही कळते.

सूचींचे स्वरूप - ग्रंथकर्ता / ग्रंथकर्ती चे नाव, पुस्तकशीर्षक, प्रकाशन साल,

पृष्ठसंख्या आणि मूल्य असे आहे. दोन्ही सूचींच्या बाबतची नवीन गोष्ट म्हणजे कुतूहलापोटी एखादे पुस्तक वाचावयाचे झाल्यास मिळविण्याच्या आधीच त्यात काय आहे, हे या सूचींमधून ध्यानी येते. उदा. विहंगगान (पुस्तक) - पक्षी ओळखणे, त्यांची दिनचर्या, त्यांची जीवनपद्धती, सवयी, कुतूहलजनक वागणुकी ह्यांचा शास्त्रीय अभ्यास केलेला आहे, अशी पूरक माहिती सूचींमध्ये आहे. यामुळे संशोधकास नेमके पुस्तक वाचण्यास मदत होईल. त्याला अपेक्षित पुस्तकालाच जाऊन भिडता येईल.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी की, सूचींत समाविष्ट असलेल्या पुस्तकांच्या प्रकाशकांचे पत्ते देण्यात आले आहेत. श्री. सुधीर थत्ते यांनी 'विज्ञानवाङ्मय सूची'त म्हटले आहे - "मराठीतल्या विज्ञानपुस्तकांच्या या सूचीचा लाभ इतर अनेकांना होईल. बक्षीस किंवा भेट म्हणून पुस्तके देणाऱ्यांना, तसेच शालेय आणि सार्वजनिक वाचनालयांना पुस्तके निवडीसाठी ही सूची वापरता येईल. कोणत्या विषयांवर पुस्तके उपलब्ध आहेत हे पाहून आवर्जून नवनव्या विषयांवर पुस्तके लिहिणाऱ्या विज्ञानलेखकांना विषयनिवडीसाठी तर ही सूची निश्चित उपयोगी पडेल. मराठीतील विज्ञानपुस्तकांवर संशोधन करायचे असेल तर ही सूची म्हणजे होकायंत्र ठरेल." (पृष्ठ ३१). श्री. थत्ते यांचे हे मत 'वैद्यक ग्रंथसूची'लाही लागू पडेल. या सूचींचा उपयोग वाचकांना, संशोधकांना, ग्रंथालयांना होईल. ■

**मराठी विभाग, एस्.पी. कॉलेज, पुणे ४११ ०३०**

# मऱ्हाटी संस्कृतीचा ऱ्हासाचे पहिले पाऊल

शिरीन कुलकर्णी

कनिष्ठ महाविद्यालयातील + २ स्तरावर माहिती तंत्रज्ञान या विषयाची ओळख करून देण्याचा शासनाचा प्रयत्न जरी स्तुत्य व स्वागतार्ह असला, तरी त्यातून निर्माण होणाऱ्या अनेक दूरगामी समस्या त्यापेक्षा अधिक भयावह ठरणार आहेत. त्या भयावहतेची थोडी झलक दाखविणे हे सदर लेखाचे प्रयोजन आहे. + २ स्तरावर द्वितीय भाषेला किंवा इंग्रजी सोडून इतर विषयांपैकी कोणत्याही विषयाला पर्याय म्हणून हा विषय येईल असा शासनाचा दावा आहे. परंतु सद्य परिस्थितीत ज्याची आखणी शासनानेच व्यवसायाभिमुख दिशेने केली आहे, असे शिक्षण आणि स्वाभाविकपणेच ती दिशा पकडून व्यवसायाभिमुख होत चाललेला आजचा विद्यार्थी, ही शैक्षणिक परिस्थिती लक्षात घेता, व्यवसायाभिमुख विषय सोडून कोणी द्वितीय भाषा किंबहुना मराठी घेईल, अशी अपेक्षाच भाबडेपणाची आहे. त्यामुळे केवळ मराठीच्या शिक्षकांचाच प्रश्न निर्माण होईल असे नव्हे; तर संपूर्ण मराठी संस्कृतीच्या ऱ्हासाचे पहिले पाऊल उचलले जाईल, इतकी या प्रश्नाची व्याप्ती मोठी आहे.

## साहित्याचे संस्कार

'अमृतातेहि पैजा जिंके' म्हणून मराठीचा गौरव आणि जाज्वल्य अभिमान व्यक्त करणाऱ्या संत ज्ञानेश्वरांपासून ते 'मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा' म्हणणाऱ्या संत रामदासांपर्यंतची परंपरा या महाराष्ट्रातच होऊन गेलेली आहे. या परंपरेने महाराष्ट्राला सांस्कृतिक वारसा दिला. पण म्हणजे नेमके काय दिले? तर जगण्याची मूल्याधिष्ठित पद्धत शिकवली. आजही महाराष्ट्रातला बहुजनसमाज 'ग्यानबा-तुकाराम'चा घोष करत पंढरपूरच्या वारीला जातो, तो केवळ आंधळेपणाने वारीची परंपरा चालू ठेवण्यासाठी नव्हे; तर संतांनी दिलेली जीवनमूल्ये त्यांच्या मनीमानसी रुजली म्हणून! याचेच एक ढळढळीत उदाहरण म्हणजे बहिणाबाई चौधरी होत. संतांनी दिलेली जीवनमूल्ये लांबच्या काळातल्या आणि खेड्यापाड्यातल्या निरक्षर शेतकरीस्त्रीपर्यंत सहजगत्या जाऊन पोचली.










म्हणूनच निरक्षर असूनही ही स्त्री काव्य रचू शकली इतकेच नव्हे, तर त्यातून जीवनाचे तत्त्वज्ञानही मांडू शकली.

परंतु केवळ एवढेच संतपरंपरेचे फलित नव्हे. आज महाराष्ट्रावर कितीही संकटे आली किंवा अस्मानीसुलतानी झाली तरी तिचा सामना हसतमुखाने व सहिष्णुतेने करण्यासही संतांनी शिकवले. म्हणूनच इतर राज्यांप्रमाणे महाराष्ट्रात अराजके माजली नाहीत किंबहुना महाराष्ट्राची शैक्षणिक, वैचारिक इतकेच नव्हे तर नैतिक पातळीही उच्चतम राहिली. संतांनी सहिष्णुता शिकवली. पण सहिष्णुता म्हणजे भ्याडपणा नव्हे असेही सांगितले. 'नाठाळाचे काठी । देऊ माथा' असे सांगणारे संत तुकाराम आणि 'सामर्थ्य आहे चळवळीचे' म्हणणारे संत रामदास यांनी अन्यायाचा निषेध करण्यासही शिकवले. महाराष्ट्राचे आनंदवनभुवन करून सोडणाऱ्या शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रातल्या गरीब शेतकऱ्याला हाताशी धरून नांगराच्या फाळाची तलवार करण्यास प्रवृत्त केले आणि अत्याचारांचे निर्दालन करण्यास शिकवले. हे सारे ज्या संतपरंपरेने घडविले ती परंपरा आणि त्यातील मूल्याधिष्ठित जीवनपद्धती यांची गरज आज संपली असे मानायचे का? मग मराठी भाषा विस्मृतीत जमा झाली, तर हे नव्या पिढीपर्यंत पोचावे कसे?

**तंत्रज्ञान आणि मातृभाषा**

यातून आणखी एक प्रश्न मनात येतो तो म्हणजे संत ज्ञानेश्वरांना भगवद्गीता मराठीत आणण्याची निकड का भासावी? त्यांना हे जाणवले होते की, कोणतेही कारण असले तरी बहुजनसमाजाला संस्कृत शिकणे शक्य नव्हते आणि समजा, शिकता आले असते तरी आधी संस्कृत शिकणे आणि मग त्या भाषेतील ज्ञान मिळवणे, कठीण व काळ व्यर्थ गमावणारे झाले असते. गोव्यात आलेल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांना जेव्हा ख्रिश्चन धर्माचा प्रसार करायचा होता, तेव्हा गोव्याची कोकणी व महाराष्ट्राची मराठी या भाषा शिकून त्यातून त्यांना बोलावे व लिहावे लागले. उद्दिष्ट कोणतेही असेल, पण ते तेव्हा बहुजनसमाजापर्यंत पोचवायचे असते, तेव्हा तेथील प्रादेशिक भाषेचाच आधार घ्यावा लागतो. महाराष्ट्रात तर मराठीचा आधार घ्यावा लागतो. एरवी इंग्रजी जाणणाऱ्या मूठभर लोकापर्यंतच नवीन ज्ञान द्यायचे, शहरातल्या चार कारखान्यांमधून नवीन तंत्रज्ञान राबवायचे आणि देखावा असा उभा करायचा की अख्खा महाराष्ट्र प्रगत झाला, याच धर्तीवर सर्व राज्ये आणि पर्यायाने भारतही प्रगतिपथावर आहे! असेच जर असेल तर हा निव्वळ भ्रम ठरेल. मग या भ्रमानेच आपण मनाचे समाधान करून घेणार आहोत का?



अनुक्रमणिका

माहिती तंत्रज्ञान किंवा तत्सम आधुनिक ज्ञानशाखेला कोणाचाही विरोध असण्याचे कारण नाहीच. पण तो विषय त्या त्या प्रदेशाच्या प्रादेशिक भाषेतून दिला गेला, तरच बहुजनसमाजापर्यंत पोचेल आणि मग शेतकरी स्वतःच्या व्यवसायाशी निगडित आधुनिक ज्ञान किंवा अद्ययावत माहिती संगणकाद्वारे मिळवू शकेल. शेतकरी हे केवळ एक उदाहरण म्हणून दिले. बहुजनसमाजातील कोणताही व्यवसाय करणाऱ्याच्या बाबतीतही हेच म्हणता येईल. आजही परदेशात स्थायिक झालेला मराठी व गुजराथी समाज संगणकाद्वारे आपल्या भाषांचा वापर करून भारताशी व आपल्या मुळांशी नाते ठेवू इच्छित आहे. तसेच परदेशांच्या उल्लेखावरून जाणवले की, जर्मनी, फ्रान्स यांसारख्या पाश्चात्य देशांबरोबरच जपान, चीन यांसारख्या पौर्वात्य देशांनीही त्यांच्या भाषा आग्रहाने जपल्या आहेत, इतकेच नव्हे तर सर्व व्यवहार आपल्या भाषेतच करण्याचा अभिमान ते बाळगून आहेत. मग हे देश अप्रगत राहिले आहेत, यांच्यापर्यंत आधुनिक ज्ञानशाखा पोचलेल्याच नाहीत, असे म्हणावे काय? याचे उत्तर जर नकारात्मक असेल. तर मग आपल्याच देशात, आपल्याच राज्यात आधुनिक ज्ञानशाखेच्या माध्यमातून प्रगती साधत असताना मातृभाषेची कूस हिरावून घेण्याचे कारणच काय? म्हणजेच महाराष्ट्रापुरते बोलायचे झाल्यास माहिती तंत्रज्ञान जर मराठीतून लोकांपर्यंत पोचले तरच प्रगतीची शक्यता अधिक! म्हणजेच माहिती तंत्रज्ञानाला मराठी पूरक व पोषक ठरेल आणि ती पर्यायी नव्हे, तर अनिवार्य करावी लागेल.

**संवादकौशल्याची गरज**

म्हणजे माहिती तंत्रज्ञान शिकवण्यासाठी मराठीचा माध्यम म्हणून वापर केला की पुरेसे झाले, असे अजिबात नव्हे. जर आपण मिळविलेल्या ज्ञानाचा आपल्याला पुढे जाऊन काही उपयोग करायचा नसेल किंवा त्या क्षेत्रात काही कार्य करायचे असेल तर एक अत्यंत महत्त्वाची कला आपल्या अंगी असावी लागते आणि ती म्हणजे संवादकौशल्य! संगणकाकडून काही काम करून घ्यावयाचे असल्यास संवाद कौशल्याची गरज पडते. संगणकाकडून ज्या व्यक्तीचे काम करवून घ्यायचे आहे त्या व्यक्तीला नेमके काय अपेक्षित आहे हे समजावून घेता येणे आणि त्यानुसार नेमक्या आज्ञा संगणकाला करता येणे, तसेच संगणकाकडून मिळालेले उत्तर त्या व्यक्तीला नेमकेपणाने समजावून सांगता येणे यासाठी संवादकौशल्याची गरज असते. व्यावसायिक व्यवहार फायदेशीरपणे साध्य करायचे असल्यास, कंटाळवाणा विषय रोचकपणे मांडायचा असल्यास, रूग्णाला



अनुक्रमणिका






रोगमुक्त करण्याच्या प्रयत्नांमध्ये त्याच्या मनाचे सहकार्य हवे असल्यास आपल्याला संवादकौशल्याची आवश्यकता असते आणि ती केवळ माहिती तंत्रज्ञानच नव्हे तर जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रात असते आणि संवादकौशल्य उत्तम प्रकारे करणे हे केवळ भाषा, तिच्यातील विविध अर्थच्छटा, तिचे विविध रंग उत्तमपणे जाणणाऱ्या व्यक्तीलाच जमू शकते. हे झाले व्यावसायिक क्षेत्रापुरते! परंतु रोजच्या जीवनातसुद्धा अवतीभोवतीची माणसे, आपल्यावर अधिकार गाजवणारी माणसे, आपल्या हाताखाली काम करणारी माणसे; एवढेच नव्हे तर, आपले आईवडील, मुले, मित्र, नातेवाईक यांनासुद्धा एकमेकांना समजावून घेण्याची गरज असते. त्याशिवाय पुढे जाणे शक्यच नसते. यासाठीही संवादकौशल्य आवश्यक असते. पण यासाठी भाषा आणि वाङ्मय यांच्या ज्ञानाखेरीज तरणोपायच नाही. कारण माणसे म्हटली की त्यांचे स्वभाव, त्यांचे गुणदोष, त्यांची सुखदु:खे, त्यांचे शारीरिक-मानसिक प्रश्न थोडक्यात त्यांचे जीवनही आलेच आणि जीवन आले की त्यातूनच मंथनातून नवनीताप्रमाणे निर्माण होणारे वाङ्मयही आलेच.

## साहित्यातून मूल्यसंवर्धन

इयत्ता बारावीच्या मराठीच्या पुस्तकातील प्रस्तावनेत "साहित्याच्या वाचनातून विद्यार्थ्यांना ज्ञानप्राप्तीबरोबरच आनंदप्राप्तीही व्हावी, समकालीन जीवनातील प्रश्नांची जाणीव होऊन त्यांच्या ठायी निकोप सामाजिक दृष्टी व राष्ट्रप्रेम निर्माण व्हावे, त्यांच्यातील साहित्यादी कलांचा आस्वाद घेण्याची क्षमता व चिंतनशीलता विकसित व्हावी, त्यांच्यातील कलानिर्मितिप्रेरणेचे पोषण व्हावे आणि श्रेष्ठ जीवनमूल्यांचा संस्कार होऊन त्यांचे व्यक्तिमत्त्व समृद्ध व्हावे ही उद्दिष्टे" पुस्तकातील वेच्यांची निवड करताना ठेवण्यात आली आहेत असे म्हटले आहे.

मूल्यसंवर्धन जसे महत्त्वाचे, तसेच जीवनातील आनंद उपभोगणे, मनोरंजन होऊन थोडी मानसिक विश्रांती मिळणे, कलानिर्मिती होणे हेही महत्त्वाचे! हे सर्व ज्या साहित्यातून होणे शक्य आहे ते साहित्यच जर आपण मुलांपासून हिरावून घेतले तर मग कसले सुसंस्कार आणि कसली कलानिर्मिती? दर्जेदार लेखन थांबून सवंग नाटके व उथळ चित्रपटांचाच भरणा झाला, तर नवल काय? आपल्याला माणसांची यंत्रे करून टाकायची आहेत की त्यांना सुजाण, जबाबदार नागरिक बनवायचे आहे? त्यांचे माणूसपण जपायचे आहे?

प्रस्तावनेत मांडलेली सर्व उद्दिष्टे साध्य करण्याचे कार्य तर वाङ्मय करतच

असते. शिवाय समाजाची नीतिमत्ता व शील वाढवण्याचे कार्यही वाङ्मय करते. एरवी संगणकाची अद्‌भूत प्रगती करणाऱ्या बिल गेट्स् बरोबर विषाणूंची निर्मिती करून संगणकाची कार्ये जागतिक पातळीवर उद्‌ध्वस्त करणारी माणसेही असतात. जे संगणकाचे ज्ञान घेऊन मुले बिल गेट्स्प्रमाणे नवनिर्मिती करू शकतात, तेच ज्ञान घेऊन मुले संगणक विषाणूही पसरवू शकतात. तुमच्या राज्यातील मुले काय करतात हे तुम्ही संगणकाव्यतिरिक्त त्यांना काय शिकवता यावर अवलंबून आहे. बारावीच्याच मराठीच्या पुस्तकात लावलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या 'विद्यार्थ्यांनो, जागृत व्हा!' या पाठात विद्यार्थ्यांना नीतिमत्तेचे व शीलाचे महत्त्व पटवून देताना ते म्हणतात, "शीलाशिवाय जर शिकलेसवरलेले लोक निपजू लागले, तर त्यांच्या शिक्षणातच समाजाचा व राष्ट्राचा नाश आहे." पण मुलांना हे तेव्हाच कळेल, जेव्हा ती बाबासाहेबांनी काय लिहिले आहे ते वाचतील. पण मराठी भाषाच जर जगली नाही, तर मग हिंदीतील म्हणीप्रमाणे 'न रहेगा बाँस, न बजेगी बाँसुरी' हेच वास्तव ठरेल.

**प्रादेशिक भाषेचे महत्त्व**

विविध रसांचा आविष्कार करणारे साहित्य माणसाला जगायला शिकवते, इतकेच नव्हे, तर दुसऱ्याला जगू द्यायलाही शिकवते. अकरावी - बारावीत आलेले विद्यार्थी तर पौगंडावस्थेच्या घसरड्या वयात असतात. अनेक क्षणिक आकर्षणांना बळी पडून गैरमार्गाला लागू शकतात. अशा वेळी त्यांना योग्य मार्गाला, योग्य दिशेला नेण्याचे; तसेच त्यांच्या विचारांना योग्य दिशा देण्याचे कार्य केवळ वाङ्मयच करू शकते. महाराष्ट्रातील बहुजनसमाजासाठी अंधश्रद्धानिर्मूलनासारख्या सामाजिक मूल्याधिष्ठित चळवळी राबवायच्या असतील तर त्यासाठीही प्रादेशिक भाषेची म्हणजे मराठीचीच गरज आहे. आपण महाराष्ट्रापुरते बोलतो म्हणून मराठीविषयी बोलणे येते. इतर भाषांमधील वाङ्मयातून त्या त्या राज्यांची त्या त्या भाषक लोकांची संस्कृती, त्यांची मूल्ये कळू शकतात. पण आधी आपल्याला आपली मूल्ये व आपली संस्कृती यांचे ज्ञान असले पाहिजे. त्यासाठी मराठीच आवश्यक आहे.

अशा परिस्थितीत माहिती तंत्रज्ञानासारखी आधुनिक ज्ञानशाखा आणताना वरील सर्व बाबींचा योग्य प्रकारे विचार केल्यास लक्षात येईल की, मराठी हा पर्याय तर नव्हेच; पण ती आधुनिक ज्ञानशाखांना पूरक व पोषकच आहे. मग तर ती अनिवार्यच असली पाहिजे. नुसतेच जागतिक मराठी परिषद, राज्य मराठी विकास

संस्था निर्माण केली, साहित्यसंमेलने भरवली की मराठीच्या बाबतीतले आपले कार्य केले असे म्हणणे म्हणजे आईला कपडे दिले, जेवायला दिले की झाले, मग प्रेम देण्याची गरज नाही, असे म्हणण्यासारखे आहे.

**भाषिक जागरूकता**

खरे म्हणजे मराठीचा अभिमान व्यक्त करण्यासाठी केवळ शासकीय कामकाज (दुर्बोध) मराठीत करून भागणार नाही. मराठीला व्यावसायिक जीवनातही स्थान मिळवून दिले पाहिजे. या दृष्टीने राज्य मराठी विकास संस्थेने वस्त्रोद्योग व्यवसायासाठी केलेले मराठी शब्दकोशाचे काम स्तुत्य आहे. असे सर्वच क्षेत्रात झाले तर महाराष्ट्राची मराठी जिवंत राहील. इतकेच नव्हे तर वर उल्लेखिलेले भाषेचे सर्व कार्य ती चोखपणे बजावेल यात शंकाच नाही. यासाठीही ती अनिवार्य करावी लागेल.

परंतु हे सर्व ज्या शासनाच्या हातात आहे, ते शासन तर मराठीच्या प्रेमाचा केवळ नाममात्र दिखावा करत दुसरीकडे तिला हाकलून देण्याच्या प्रयत्नात आहे. अशा प्रसंगी खरे तर सर्वच मराठी भाषकांनी पुढे सरसावायला हवे आहे. पु.ल. देशपांडे, कुसुमाग्रज यांच्यावर मनापासून प्रेम करणारा आणि त्यांच्या मृत्यूने दुःखसागरात बुडून गेलेला मराठी समाज करतो आहे तरी काय? सर्व साहित्यसंमेलनांची अध्यक्षस्थाने भूषविणारे, अनेक समित्यांवर कार्यरत असणारे नामवंत साहित्यिक, विचारवंत यात उतरल्याशिवाय राहणार नाहीत, अशी अपेक्षा आहे. त्या प्रश्नात साहित्यिकांनीही पुढाकार घेतला पाहिजे. असे झाले नाही, तर हे केवळ मराठी शिक्षकांचे दुर्दैव नाही, तर सर्व मराठीभाषकांचे, महाराष्ट्राच्या संस्कृतीचे, महाराष्ट्राचेच दुर्दैव आहे आणि मराठी शिक्षकांच्या नोकऱ्या जाणे हा ताबडतोबीने होणारा परिणाम असला तरी या सर्व परिस्थितीचे जे दूरगामी परिणाम होतील, ते अत्यंत घातक ठरतील, माणसांची यंत्रे तयार होतील आणि महाराष्ट्र हे मर्ढेकरांच्या भाषेत "हलो हलोला हलकट उत्तर" देणारे यंत्रराष्ट्र होऊन बसेल!

■

(पूर्व प्रसिद्धी - 'महाराष्ट्र टाईम्स' ९ ऑगस्ट)

**२०१ बुल्फो सोसायटी. प्लॉट नं. २७, सेक्टर ९ - ए,**
**वाशी, नवी मुंबई - ४०० ७०३.**

# सावधपणे भाषा वापरणाऱ्यांसाठी उपयुक्त कोश

कल्याण काळे

('मराठी पर्यायी शब्दांचा कोश' - संपा. मो. वि. भाटवडेकर, साधना प्रकाशन, पुणे, मार्च २०००, पृ. २०+८२८, मूल्य - ३५०/- रु.)

श्री. मो. वि. भाटवडेकर हे मुळातले एक नामांकित अर्थशास्त्रज्ञ. निवृत्तीनंतर त्यांचे लक्ष भाषेच्याही अर्थव्यवहाराकडे वेधले गेले आणि त्यांनी पुष्कळ परिश्रम घेऊन 'मराठी पर्यायी शब्दांचा कोश' हा कोश सिद्ध केला. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन. अर्थशास्त्राखेरीज संगीत, साहित्य, शिक्षणशास्त्र, इतिहास संशोधन इ. अनेक विषयांमध्ये त्यांना रस आहे. हे सर्व व्याप सांभाळूनही त्यांनी त्यामानाने अगदी अल्पावधीत हा कोश पूर्ण केला. यातच त्यांच्या परिश्रमशीलतेची साक्ष पटते. इंग्रजीत ज्याप्रमाणे निरनिराळ्या संकल्पनांशी निगडित असे शब्दपर्याय देणारे 'थीसॉरस'सारखे विशेष कोश असतात, तसे मराठीतही का असू नयेत हा विचार मनात येऊन त्यांनी दि. २६ जानेवारी, १९९६ रोजी तशा प्रकारचा कोश तयार करायला सुरुवात केली आणि मार्च २००० मध्ये तो छापून प्रसिद्धही केला. या कोशाची डबल क्राऊन आकाराची जवळजवळ साडेआठशे पृष्ठे आहेत. त्यात जवळजवळ ७००० नोंदी असून त्यांच्यापुढे दिलेल्या पर्यायांची संख्या धरून एकूण ३०,००० शब्दांचा संग्रह आहे. या कोशाचे मुख्य दोन भाग आहेत. प्रत्यक्ष कोश आणि त्यातील शब्दांची अकारविल्ह्यानुसार दिलेली सूची. प्रत्यक्ष कोशाने ४१७ पृष्ठे व्यापली असून त्यातील शब्दांच्या सूचीने ४०६ पृष्ठे व्यापली आहेत. याशिवाय त्याला स्वतः भाटवडेकरांचीच 'प्रक्रिया' या शीर्षकाची वीस पृष्ठांची प्रस्तावना आहे. आरंभी प्रा. वसंत बापट यांचे साधना प्रकाशनाच्यावतीने दोन पानी प्रकाशकीय निवेदन असून ज्या राज्य मराठी विकास संस्थेने या कोशासाठी घसघशीत अर्थसाहाय्य केलेले आहे. तिच्या संचालक डॉ. सरोजिनी वैद्य यांच्याही एकपानी निवेदनाची

त्याला जोड आहे. शेवटी मूळ शब्दसंग्रह आणि त्यावरची शब्दसूची यांच्यासाठी अनुक्रमे दोन पानी आणि दोन पानी शुद्धिपत्रेही जोडलेली आहेत. अशी या कोशाची एकंदर सामग्री आहे.

पर्यायी शब्दकोशात जसे एका शब्दासाठी अनेक पर्याय दिले जातात तसे ते प्रचलित सर्वसामान्य कोशात पण दिलेले असतात. मग पर्यायी कोशाचे वेगळेपण कशात आहे? सर्वसामान्य शब्दकोशात शब्दांचे अर्थ देण्याचे अनेक प्रकार असतात. त्यात समानार्थी शब्द असतात, शब्दांचे स्पष्टीकरण असते, शब्दाने निर्दिष्ट वस्तूचे वर्णन असते, प्रसंगी शब्दांच्या अव्याप्ती आणि अतिव्याप्ती या दोषांपासून मुक्त अशा व्याख्या दिलेल्या असतात. या सर्व प्रकारांमध्ये समानार्थी प्रतिशब्दांनाच फक्त पर्याय शब्द म्हणता येईल. बाकीच्या स्पष्टीकरणादी प्रकारांना पर्याय शब्द म्हणता येणार नाही. या समानार्थी शब्दांची स्वतंत्र सूची सर्वसामान्य कोशात देण्याची पद्धत नसल्याने हे पर्याय शब्द शोधणे कठीण होते. सर्वसामान्य कोशात मुख्य उद्देश शब्दांचे अर्थ देण्याचाच असतो. तसेच शब्दकोशात अर्थच्छटा देण्याची पद्धत नसते. त्यामुळे सर्वसामान्य कोशाचा पर्यायी शब्दांचा कोश म्हणून उपयोग करता येत नाही. पर्यायी शब्दकोशाची निर्मिती त्यासाठीच झाल्यामुळे त्याचा तसा उपयोग अपरिहार्यच आहे.

आपल्याकडे अमरकोशासारखे जे कोश निर्माण झाले ते एकप्रकारे पर्यायी कोशच होत. ते प्रामुख्याने समानार्थी कोश होते; पण आजच्या काळात केवळ समानार्थी कोशाचा उपयोग फार मर्यादित स्वरूपाचा आहे. त्यामध्ये एखाद्या शब्दाचे समानार्थी म्हणून इतर अनेक शब्द दिले जातात. उदा., - 'पाणी'. या शब्दापुढे उदक, नीर, जल, तोय, सलिल, जीवन असे शब्द त्यात आढळतील. वापरणाऱ्याने त्यातून आपल्याला योग्य वाटेल तो शब्द निवडावयाचा असतो, पण असे शब्द निवडण्याची गरज आपल्याला केव्हा भासू शकेल? जुन्या काळात वृत्तबद्ध, सयमक कविता लिहिली जात असे. त्या वेळी वृत्ताच्या सोईसाठी लगक्रमामध्ये अथवा मात्रासंख्येमध्ये बरोबर बसेल अशा शब्दांची कवीला गरज असे. ती गरज भागवण्यासाठी शब्दकोशाचा उपयोग होत असे. आज मुक्तछंदाच्या काळात समानार्थक शब्दांची गरज कवींना भासण्याची शक्यता कमीच आहे. सामान्य व्यवहारात वक्तृत्वासाठी एकच विचार पुन्हा पुन्हा घोळून घोळून सांगण्याची काहींना सवय असते. अशा व्यक्तींसाठी कदाचित अशा समानार्थक कोशाचा उपयोग होऊ शकेल; पण अशाप्रकारे पर्यायी शब्दांची माळ लावून

बोलण्याची पद्धत फारशी प्रशस्त मानली जात नाही. अनेक प्रतिशब्द वापरून बोलणे म्हणजे पुनरुक्ती करून बोलण्यासारखेच होय. त्यापेक्षा नवीन विचार, नवीन कल्पना त्यांच्या सूक्ष्मातिसूक्ष्म छटांसह नेमक्या शब्दांत मांडता येणे हेच भाषेचे खरे सामर्थ्य होय. या संदर्भात डॉ. ना. गो. कालेलकर म्हणतात, "कमळाला असणारे पन्नास प्रतिशब्द माहीत असण्यापेक्षा पन्नास इतर फुलांची नावे माहीत असणे ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे." ('पायाशुद्ध मराठी' - समावेश भाषा आणि संस्कृती, आ. २ री पृ. ५७). तसे पाहिले तर जिवंत भाषेमध्ये समानार्थी शब्द खऱ्या अर्थाने नसतातच. ते तसे वरवर दिसत असले तरी त्यांची वापरण्याची क्षेत्रे भिन्न भिन्न असतात. त्यांचे गुणात्मक अर्थ बोलणाऱ्या-ऐकणाऱ्याच्या दृष्टीने भिन्न असतात. मरणे, वाटणे, निधन पावणे, खपणे, ठार होणे इ. शब्दांच्या उपयोगावरून हे लक्षात येईल.

मराठीत पर्यायी शब्दकोशाचे प्रयत्न यापूर्वी अनेक झाले आहेत. बाबा पदमनजींची 'शब्दरूपावली' (१८६०). विद्याधर वामन भिडे यांचा 'मराठी भाषेचे वाक्प्रचार व म्हणी' (१९१०) भास्कर पां. हिवाळे यांचा 'Marathi synonymy Explained' (१९१७), य.ब. पटवर्धन यांची 'शब्द कौमुदी' (१९६५), द.बा. महाजन यांचा 'अभिनव समानार्थी आणि विरुद्धार्थी मराठी शब्दकोश' (१९६५), य.ना. वालावलकर यांचा 'समानार्थी आणि विरुद्धार्थी शब्दकोश' (१९९५), वि.शं. ठकार यांचा 'अभिनव मराठी-मराठी-इंग्रजी पर्याय शब्दकोश' (२०००) असे पर्यायी कोश म्हणता येतील. असे कोश यापूर्वी झालेले आहेत. भाटवडेकरांचा प्रस्तुतचा कोश हा सर्वांत अलीकडचा आणि आकाराने सर्वांत मोठा असा कोश आहे. इंग्रजीतील रोजेच्या थीसॉरसपासून प्रेरणा घेऊन मराठीतही अशा प्रकारचा कोश तयार करायचा या ध्येयाने ते या कोशाच्या रचनेकडे वळले.

हा पर्यायी शब्दांचा कोश आहे. याचा अर्थ नेहमीचे शब्द आणि त्याचे अर्थ देणाऱ्या शब्दकोशांपेक्षा तो वेगळा आहे, हे स्पष्ट आहे. नेहमीच्या शब्दार्थकोशाचा विशिष्ट शब्दाचा अर्थ पाहण्यासाठी उपयोग होतो, पण या पर्यायी शब्दकोशात नोंदीतील शब्दाच्या अनुरोधाने त्याच्यापुढे जे पर्याय दिलेले असतात त्यांना महत्त्व असते. नेहमीच्या शब्दकोशात आपण शब्दाकडून त्याच्या अर्थाकडे जातो, तर या पर्यायी शब्दकोशात अर्थाकडून तद्वाचक शब्दांकडे आपण जातो. त्यात नोंदीच्या शब्दाच्या अनुरोधाने जे विविध पर्याय दिलेले असतात त्यातील अधिक योग्य अशा पर्यायाची आपण निवड करत असतो.










सर्वसामान्य समावेशक आणि प्रातिनिधिक शब्दकोशात भाषेच्या सार्वकालिक अवस्थातील शब्द, भाषेच्या, वर्तमानकालातील सर्व प्रादेशिक बोलीतले शब्द, सर्व प्रकारच्या सामाजिक स्तरावरील बोलीतले शब्द, भाषेत इतर परभाषांतून आलेले शब्द या सर्व प्रकारच्या शब्दांचा संग्रह असतो. कारण त्याचा उद्देशच सर्वांना सर्वकाळी उपयुक्त होईल असा सर्वसंग्राहक कोश उपलब्ध करून देणे हा असतो. त्याद्वारे लिखित, अलिखित अशा सर्व प्रकारच्या शब्दांपैकी कोणत्याही शब्दाचा अर्थ कळावा हा असतो; पण पर्यायी शब्दकोश प्रत्यक्ष वापरण्यासाठी असतो. आपल्याला बोलण्याच्या अथवा लिहिण्याच्या ओघात एखादा शब्द अडतो. त्याच्या अर्थाचे क्षेत्र किंवा स्थूल संकल्पना जाणवत असते पण नेमका शब्द आठवत नाही. अशा वेळी हा कोश आपल्यापुढे अनेक समानार्थी वा अर्थच्छटादर्शक शब्दांचे पर्याय ठेवतो. त्यातून योग्य ती निवड करून आपण तो शब्द वापरू शकतो. त्याचे असे स्वरूप असल्याने हा कोश प्रायः वर्तमानकालीन प्रमाण भाषेच्या संदर्भातच असतो. भाषेतील कालिक अथवा प्रादेशिक भेद यांना या स्वरूपाच्या कोशात स्थान नसते. त्याचप्रमाणे परभाषांतील शब्दांनाही या कोशात स्थान नसते. पण परभाषेतून आलेले आणि व्यवहारात रुळलेले शब्द औचित्य सांभाळून या कोशात यायला हरकत नाही.

या कोशाची वीण दुहेरी स्वरूपाची आहे. मूळ नोंदीखाली एकाखाली एक अशी अपसारण चिन्हे देऊन त्यापुढे त्या नोंदीशी निगडित अशा विविध अर्थच्छटा दाखवणारे शब्द दिले आहेत. त्या अर्थच्छटादर्शक शब्दांच्यापुढे त्यांशी समानार्थक असे शब्द दिले आहेत. अशा तऱ्हेने प्रत्येक नोंदीसाठी अर्थच्छटादर्शक अनेक पर्याय आणि त्यांच्याशी समानार्थक असे शब्द दिल्यामुळे हा कोश समानार्थक आणि सम कल्पनार्थच्छटादर्शक असा दुहेरी झाला आहे. उदाहरणादाखल पुढील नोंद पहा.

डाग (ना.)

- चटका, चरका (विस्तवाचा शरीरावर दिलेला);
- धब्बा (शाई इत्यादींनी पडलेला);
- जिन्नस, नग, वस्तू;
- खूण, चट्टा, जन्मखूण, तीळ, वण;
- अलंकार, अवतंस, आभूषण, दागिना, भूषण;
- कलंक, काळिमा, बट्टा, लांछन.

कोशातील नोंदीच्या शब्दांना त्या त्या आरंभीच्या अक्षराच्या गटातील

अनुक्रमांक दिलेले आहेत. त्या नोंदीत समाविष्ट असलेल्या शब्दांना क्रमांक दिलेले नाहीत. दुसऱ्या भागातील सूचीमध्ये नोंदीचे शब्द आणि तदंतर्गत विविध पर्याय शब्द यांची एकत्रित अशी सूची अकारविल्ह्याने दिली असून त्यांचे पत्ते त्यांचा समावेश असलेल्या नोंदीच्या शब्दाच्या क्रमांकानुसार दिले आहेत. त्यामुळे कोशातील ३०,००० शब्दांपैकी कोणताही शब्द चटकन सापडतो.

हा वस्तुतः सम कल्पना अर्थच्छटादर्शक शब्द आहे. त्यामुळे त्यातील नोंदीचे शब्द निरनिराळ्या संकल्पनांचे प्रतिनिधित्व करणारे असले पाहिजेत. पण ही संकल्पनावाचक शब्दांची निवड- प्रचलित शब्दकोश समोर ठेवून त्यातील शब्दांच्या वर्णक्रमानुसार करण्यात आलेली असल्याने विशिष्ट कल्पनागटातील जो शब्द प्रथम हाताशी आला तोच त्या कल्पनागटाचा प्रातिनिधिक शब्द ठरला. उदाहरणार्थ, मराठीच्या दृष्टीने पाणी, उदक, नीर, तोय, जल, वारि या गटात केव्हाही 'पाणी' शब्द पौनःपुन्यतेच्या दृष्टीने अधिक प्रचिलत आहे. तोच वास्तविक त्या गटाचा प्रातिनिधिक शब्द असायला हवा. पण प्रचलित कोशामध्ये 'उदक' शब्द वर्णानुक्रमाने प्रथम हाताशी आला, म्हणून तोच मुख्य नोंदीचा शब्द ठेवून त्याच्या अंतर्गत पाणी, जल इ. शब्दांचा समावेश करण्यात आला आहे. त्यामुळे शब्द शोधण्याच्या प्रक्रियेत काही अडचण येते असे नव्हे. पण भाषेतील प्रत्येक शब्दाला जे कमी अधिक वजन प्राप्त झालेले असते त्याकडे दुर्लक्ष केल्यासारखे होते.

हाताशी असलेल्या प्रचलित शब्दकोशातील शब्द घेतल्यामुळे वेगळी वर्णानुक्रमाने रचना करण्याचे श्रम वाचले असले तरी प्रचलित शब्दकोशाच्या स्वरूपामुळे या निवडीमध्ये चुकाही झालेल्या आहेत. आपण अगोदरच पाहिले आहे, की, हा कोश मुख्यतः भाषा वापरण्यासाठी आहे. त्यामुळे भूतकाळातले प्रचारातून गेलेले शब्द या कोशात येण्याचे कारण नाही. पण अशा नोंदी या कोशात आढळतात. उदा., वीजन (व. ३७२) ही नोंद पहा. हा शब्द महानुभावांच्या लीळाचरित्रातून घेतलेला आहे. 'आसन, बैठक'चा अर्थाने तो कुठेही वापरला जात नाही. तेव्हा हा शब्द फक्त प्रचलित कोशाच्या अनुकरणातून आलेला आहे. ही नोंद दाते कोशातून नकलून घेतलेली आहे. तो कोश सर्वसमावेशक कोश असल्याने त्यात ही नोंद येऊ शकते. पण पर्यायी कोशात तिला स्थान नाही. तसाच 'राऊळ' (र ७५ अ) हा 'देऊळ, मंदिर' या अर्थाचा शब्द या कोशात यायला नको होता कारण तो यादवकालीन मराठीतला शब्द आहे. आता तो प्रचारात नाही.

त्याचप्रमाणे शब्दार्थ देणे या कोशाचे प्रयोजन नाही. विशिष्ट संकल्पनेसाठी

समर्पक शब्द सुचवणे हे त्याचे प्रयोजन आहे. पण या कोशात कित्येक नोंदी केवळ शब्दार्थ देण्यासाठीच आलेल्या दिसतात. उदाहरणार्थ, पुढील काही नोंदी पहाव्यात. धेडगुजरी - अनेक भाषांची खिचडी. खिंडार - मोडकळीस आलेले भग्नावशेष. क्षेपणास्त्र - फेकून (नेमक्या ठिकाणी) मारावयाचे अण्वस्त्र. खावटी - अन्नधान्याचा साठा. तुंबडी भरणे - भरपूर पदरात पाडून घेणे. मोर्चा - हक्क मागण्यासाठी काढलेली मिरवणूक. मुका - बोलता न येणारा. मानधन - कामाचा सन्माननीय मोबदला. रक्त आटवणे - अती मेहनतीने काम करणे. वटावणे - पैशात रूपांतर करणे. बदलून पैसे घेणे. मितव्ययी - कमी खर्चात भागवणारा. प्रतिपक्ष - उलट/दुसरी बाजू मांडणारा पक्ष. मटकावणे - अधाशीपणाने खाणे. एकदम खाऊन टाकणे. नियोजन - उद्दिष्टानुसार कामाची आखणी. पाणी मुरणे - संशयाला जागा असणे. पाठमोरा - तोंड फिरवलेला, पाठ करून बसलेला. अधोरेखित नोंदीच्या पुढे दिलेले शब्दसमूह हे सरळसरळ त्यांचे शब्दार्थ आहेत. ते स्पष्टीकरणाच्या स्वरूपाचे आहेत. त्यांचा कोणीही पर्यायी शब्द म्हणून वापर करणार नाही. त्यांना समानार्थी शब्दही म्हणता येणार नाही. पर्यायी शब्दकोशात अशा प्रकारच्या शब्दार्थांची गरज नसते.

काही अर्थासारखी वाटणारी ही स्पष्टीकरणे चुकीचीही वाटतात. उदा., भरारी - जलदीने प्रवास करणे. यंत्र - ऊर्जेवर चालणारे उपकरण. खिंड - अडचणीचा रस्ता. खितपत पडणे - अशक्त होत जाणे. तिरकम शेट - श्रीमंतीचा आव आणणारा, श्रीमंतीची फुशारकी मारणारा. दाते कोशात हे अर्थ दिलेले आढळतात. पण हा प्रस्तुत कोश आजच्या प्रचलित भाषेशी निगडित आहे. असा संपादकांचा दावा आहे. मग असे प्रचारातून गेलेले अर्थ या कोशात का यावेत?

या कोशाच्या रचनातंत्रावरही आक्षेप घेता येण्यासारखा आहे. एखाद्या नोंदीपुढे तिचे पर्याय म्हणून काही शब्द दिल्यानंतर त्या प्रत्येक शब्दाच्या नोंदी स्वतंत्रपणे देऊन पुन्हा तीच यादी मागच्या नोंद शब्दाचा समावेश करून पुनरावृत्त करण्यात अर्थ नव्हता. पर्यायी शब्द आणि नोंद शब्द मिळून एक संच तयार होतो. या संचातील प्रत्येक शब्दाची नोंद मागच्या सूचीच्या विभागात स्वतंत्रपणे केलेली असते. त्या नोंदीबरोबर त्या शब्दाचा कोशातील पत्ताही दिलेला असतो. त्यामुळे एका नोंदीत समानार्थी म्हणून नोंद झाल्यानंतर त्या नोंदीतील प्रत्येक समानार्थी शब्दांच्या स्वतंत्र नोंदी करण्याची काहीच गरज नव्हती. केवळ अगदीच वेगळा अर्थ असेल तर तेवढ्यापुरती स्वतंत्र नोंद करायला हरकत नव्हती. पण या

कोशात अनेक ठिकाणी स्वतंत्र नोंदी करण्यात आल्या आहेत. त्यामुळे कोशात अनावश्यक भर पडते. उदा. 'नियती' ही नोंद पहा. तिच्यापुढे 'दैव, नशीब, प्राक्तन असे शब्द दिल्यानंतर 'नशीब' या शब्दासाठी 'नियती, दैव, प्राक्तन' अशा नोंदी पुन्हा देण्याचे कारण नव्हते. 'डरपोक' आणि 'नामर्द' यांच्याही बाबतीत असेच झाले आहे. 'पैजार' या नोंदीतील 'स्वेटर, जोडा, चप्पल' या समानार्थी शब्दांची किमान तीन वेळा तरी पुनरावृत्ती झाली आहे. 'दक्षिणा', 'खैरात' या दोन्ही शब्दांची आलटूनपालटून पुनरावृत्ती झालेली आहे.

या कोशात काही स्तुत्य प्रयोग केलेले आहेत. या कोशात दलित - ग्रामीण साहित्यातीलही शब्द घेतले आहेत. साहित्यिक मराठीबरोबरच व्यावहारिक क्षेत्रातील मराठीचेही शब्द घेतले आहेत. कार्यालयीन व्यवहार, टिप्पण्या, पत्रव्यवहार अशा क्षेत्रातील शब्द घेतले आहेत. हल्ली लोक हिंदी, इंग्रजी या भाषांतील शब्दही आपल्या बोलण्यात पेरत असतात. म्हणून या कोशातही इंग्रजी शब्द, हिंदी शब्द - पर्यायी शब्द म्हणून कोशकारांनी दिले आहेत. इथे थोडा धोरणात्मक मतभेद होण्याची शक्यता आहे. लोक इंग्रजी हिंदीचा वापर का करतात? काही लोक फारसे गंभीर नसतात. केवळ चूष म्हणून हिंदी इंग्रजीचा वापर करतात. पण त्यामुळे त्यांची भाषा प्रदूषित होते आहे याचे त्यांना भान नसते. या प्रदूषणाला कोशकारांनी हातभार लावायचा का? काही लोकांना मराठीतील योग्य शब्द सुचत नाहीत अथवा आठवत नाहीत म्हणून अपरिहार्यतेने ते त्यांच्या जागी हिंदी, इंग्रजी शब्दांचा वापर करतात. अशा वेळी त्यांची गरज भागवण्यासाठी योग्य ते मराठी शब्द कोशकाराने पुरवायचे की त्यांना तशीच प्रदूषित भाषा वापरायला उत्तेजन द्यायचे? मला तरी हिंदी मराठीचे मराठी कोशात अवास्तव स्तोम माजवणे गैर वाटते. खेमा, तनाखोरी असले शब्द वापरणारी मराठी माणसे किती असतील? कोशकारांनी आपल्या काही मर्यादाही प्रस्तावनेत व्यक्त केल्या आहेत. हा पर्याय कोश म्हणजे एक प्रकारचा संकल्पना कोश आहे. त्यासाठी संकल्पनांचे वर्गीकरण करणे आवश्यक होते. पण आजचे वर्गीकरण उद्या कालबाह्य होते. तर्कशुद्ध व सूक्ष्म वर्गीकरणात सुलभता नसते व त्यामुळे त्याचा उपयोग करण्यास अवघड होते. कोणतेही वर्गीकरण असमाधानकारक होते. अशा अडचणी जाणवल्यामुळे त्यांनी वर्गीकरणाचा प्रकार टाळला आहे. शब्द संकल्पनांचे वर्गीकरण सर्वस्वी परिपूर्ण आणि समाधानकारक होण्याची शक्यता नसतेच. अगदी रोजेच्या कोशातील वर्गीकरणसुद्धा समाधानकारक नाही. पण त्या स्थूल वर्गीकरणामुळे अधिकाधिक शब्द एका जागी

सापडू शकतात. हा त्याचा फायदा आहेच, हे विसरता कामा नये. प्रस्तुत कोशकारांनादेखील एखादे कामचलाऊ वर्गीकरण करायला कठीण नव्हते. त्यामुळे एकाच शब्दाच्या तीन तीन ठिकाणी नोंदी करण्याची आपत्ती तरी टाळता आली असती. कोशाची निर्मिती हे खूप मोठ्या खर्चाचे काम आहे. त्यामुळे तेथे द्रव्य, जागा यांचा वापर अतिशय काटकसरीनेच व्हायला हवा. तेव्हा अनावश्यक पुनरावृत्तीचे समर्थन करता येणार नाही.

याच कारणासाठी या कोशाचा आणखी एक दोष नोंदवल्यावाचून राहवत नाही. प्रत्येक नव्या वर्णाचा प्रारंभ नव्या पानावर करायचा. या धोरणामुळे वर्णसमाप्तीचे पान बरेचसे कोरे सोडण्याची पाळी या कोशावर अनेक वेळा आली आहे. तसेच प्रत्येक नोंदीसाठी संपूर्ण ओळ राखून ठेवण्यानेसुद्धा या कोशात बरीचशी जागा वाया गेली आहे. ऑक्सफोर्ड, वेब्स्टर कोशात छपाई कशी भरगच्च असते. त्या पार्श्वभूमीवर या कोशात जागेची भरमसाट उधळपट्टी झालेली आहे. पुढच्या आवृत्त्यात पडणाऱ्या भरीच्या शब्दांसाठी ही जागा हेतुपुरस्सर राखून ठेवली आहे - असे स्पष्टीकरण याबाबतीत पुढे करता येईल. पण ते न पटणारे आणि तर्कविसंगतही आहे.

कोशात शब्दांची प्रमाणित रूपे मिळतात. त्यांच्या शुद्धलेखनाचे आदर्श मिळतात म्हणून आपण कोशाकडे जातो, पण तोच कोश जर अशुद्ध छापला गेला असेल किंवा अशुद्ध रूपे देत असेल तर त्याची विश्वसनीयता कमी होते. या कोशास चार पानांचे शुद्धिपत्र जोडावे लागले आहे. त्याशिवाय दखल न घेतलेल्या कितीतरी चुका या कोशात राहून गेलेल्या आहेत. उदा. सहेतूक (स १०६), सान्निध्य (स ८८, स ५६), लोकप्रतिनिधीगृह (स ८७), काबूंत (स ७२), संमतीज्ञापन (स ६९), प्राणहानीकारक (स ९२), सज्यि (स १२६), सच्चिदघन (स ११८), आंकडेशास्त्र (स १३), संततीनियमन (स ३५), प्रसिद्धीयंत्रणा (स ४५), सामूहिक रजार (स ५२), सकृत्‌दर्शनी (स १०९), सयुक्तिक (स २५६), विश्रांतिस्थान (स २९१), सूचीत (स ३४५), कुंठीत (स ३६६), व्यक्तीगुण (स ४१४), प्राविण्य (स ४७३), वडिलोपार्जीत (स ४८६), रसभरीत (स ५२७), जिवश्चकंठश्च (स ५४४), सुसंबंद्धतात्मक (स ५५४), नीतीमार्ग (स ५९५), मृदु (स ५९१), स्वयंभूतत्त्व (स ६५१), रूपी (स ६६७), प्रकृतीस्वास्थ्य (स ६७६) इ. या केवळ 'स' वर्णाच्या शब्दनोंदींमधील चुका आहेत. शेवटी दिलेल्या शुद्धिपत्रामध्येही अनेक चुका राहिलेल्या / झालेल्या आहेत. उदा., अनुनुकूल

(अननुकूल हवे), स्त्रवणे (स्रवणे हवे), शष्ठ्यब्दि पूर्ती (षष्ट्यब्दपूर्ती हवे), सहोदर सदृश्य (सहोदरसदृश हवे), धांवाधाव (धावाधाव हवे), परिप्लत (परिप्लुत हवे), सहिष्णु (सहिष्णू हवे), सदृश्यता (सदृशता हवे).

या कोशातील अनेक नोंदी कोशाच्या उद्दिष्टांच्या संदर्भात अनावश्यक वाटतात. उदा., वीरहंता, घनवर्धनीय, तनाखोरीं, सगई, प्रभाव्य, प्रवरण, प्रतिपूतीक, पणपणे इ.

कोशाचा आकार पाहाता यावर दाखविलेल्या त्रुटी नगण्य ठरतील. कोशातील अनेक नोंदी परिश्रमपूर्वक केलेल्या आहेत. याची साक्ष त्याच्या पानापानांतून पटते. नोंदशब्द निवडणे, त्याच्या विविध अर्थच्छटांची यादी करणे, त्या प्रत्येक अर्थच्छटेसाठी समानार्थक शब्द शोधणे हे मोठे जिकिरीचे काम आहे. श्री. भाटवडेकरांनी चार-पाच वर्षे राबून ते केलेले आहे. त्यांच्या या प्रयत्नांचे मोल जाणून राज्य मराठी विकास संस्थेनेही अर्थसाहाय्य करून कोशप्रसिद्धीला हातभार लावला आहे. आता वानवा आहे ती कोशांचा उपयोग करणारांची. हा कोश केवळ तज्ज्ञांच्या उपयोगासाठी नाही. तो सर्वसामान्यांसाठी आहे. योग्य आणि नेमक्या शब्दांची गरज आपणां सर्वांनाच भासत असते. पण त्यासाठी कोशाचा उपयोग होऊ शकतो, याचे आपल्यापैकी कुणालाच भान नसते. मग कधी तडजोड करून सुचेल तो शब्द वापरून आपण मोकळे होतो. ऐकणारे / वाचणारेही याबाबतीत उदासीनच असतात. अशा तऱ्हेने एकमेकाला सहकार्य करीत मोठ्या सामंजस्याने आपला भाषाव्यवहार चाललेला असतो. त्यामुळे भाषासौष्ठव बिघडते. याची फिकीर कुणाला असते? हल्ली सुशिक्षित होणे म्हणजे बहुभाषावेत्ते होणे होय. मातृभाषेखेरीज अन्य भाषांचे जुजबी ज्ञान जवळ असले की मातृभाषेतील शब्दांना परभाषेतील पर्याय वापरून तिला ठिगळे जोडण्याचे काम सर्रास चालू असते. त्यामुळे भाषेत प्रदूषण वाढते, हेही आपल्या गावी नसते. आपण फक्त व्यवहारवादी आणि उपयुक्ततावादी झालो आहोत. भाषेचे सौष्ठव, पदलालित्य, विचारांची नेमकी अभिव्यक्ती या मूल्यांचीच गरज आपल्याला जाणवत नसल्याने त्यांची जपणूक करणाऱ्या प्रस्तुत कोशांसारख्या प्रयत्नांचे मोल तरी आपल्याला कसे उमगावे? ज्या काही थोड्या वेड्या लोकांना ते उमगलेले असेल ते निश्चितपणे त्याचे स्वागत करतील, यात काही शंका नाही.

■

**श्री दीपक सह. गृहरचना संस्था, ९२/३, तुळशीबागवाले नगर, पर्वती, पुणे ९**












# कालिदास गुप्त यांचे भाषाप्रेम

विजया देव

सुप्रसिद्ध हिंदी लेखक गुलजार यांनी "भाषा ऐकणारा श्रीमंत पंडित" असे ज्यांचे वर्णन केले आहे ते कालिदास गुप्त हे नामवंत उर्दू कवी, भाषाप्रभू आणि गालिबतज्ज्ञ होते. मार्च महिन्यात त्यांचे निधन झाले. गेली वीस वर्षे त्यांचे वास्तव्य मुंबईत होते.

उर्दू भाषा आणि साहित्य यांचा त्यांचा व्यासंग दांडगा होता. उर्दूमधील सर्वोत्कृष्ट साहित्य निर्मितीबद्दल दिला जाणारा 'आलम-ए-फरोग-ए-उर्दू' हा सन्मान त्यांना मिळाला होता. इंडोनेशिया, मलेशिया, भारत, बांगलादेश, पाकिस्तान, सौदी अरबस्तान आणि अमिराती या देशांमधून एकाची या पुरस्कारासाठी निवड केली जाते. "मुस्लिम जगतात आदराला पात्र असलेला आणि चाळीस हजार पुस्तकांचा स्वतःचा संग्रह असणारा हिंदू विद्वान" म्हणून त्यांच्यावर बी. बी. सी. ने माहितीपटही काढला आहे. भाषेचा जोम आणि भाषेची मूळ लय यांच्यावर त्यांनी मनापासून प्रेम केले.

लुधियानात त्यांना शिरोमणी पुरस्कार प्रदान होणार होता. त्या वेळी लुधियानाला जातानाचे त्यांचे पुढील उद्‌गार माननीय आहेत. "मी तिथं जाऊन चांगली पंजाबी ऐकणार आहे. चांगली पंजाबी ऐकायची, तर पंजाबला छोट्या छोट्या गावांतून फिरायला पाहिजे. मुंबईत काय होतं. मुंबईत खरी मराठी नष्ट होते. गुजराती भ्रष्ट होते. पंजाबीचंही तसंच होतं. यांत्रिक शहरीपणात मुंबईत, भाषेचं रूप वेडवाकडं होत. अस्सल भाषा भेटतच नाही. खरी मराठी ऐकायची तर पुणे, सातारा, कोल्हापूरला जायला पाहिजे. हीच गोष्ट पंजाबाची."

दुसरी भाषा ऐकायला मन श्रीमंत असावे लागते. कालीदासजी प्रत्येक भाषेविषयी सतत उत्सुक असत. कारण ते आतून सरसशीत होते. ते असे म्हणत असत की, महाराष्ट्राच्या अंतर्गत भागात एखादा परभाषी दहा दिवस राहिला, तर त्याला मराठी शिकण्याची इच्छा होईलच आणि हेच खऱ्या मराठीचे अंगभूत सामर्थ्य आहे.





अनुक्रमणिका

भाषेबद्दल विलक्षण आस्था असणाऱ्या या व्युत्पन्न पंडिताबद्दल प्रत्येक भारतीयाने कृतज्ञता बाळगायला पाहिजे.

■

(आधार - 'सकाळ' रविवार पुरवणी १ एप्रिल २००१ आणि संपादकीय टाइम्स ऑफ इंडिया गुरुवार १२ एप्रिल २००१)

---

मुंबईहून प्रसिद्ध होणाऱ्या 'इंदुप्रकाश' या वृत्तपत्रात जुलै १६ ते ऑगस्ट १८९४ या कालावधीत श्री अरविंदांनी एक लेखमाला लिहिली होती. हे लेख बंकिमचंद्र चतर्जी यांच्यावर होते.

बंकिमचंद्रांच्या प्रतिभेच्या पैलूंविषयी बोलताना, त्यांचे साहित्यगुण, कर्तृत्व, प्रतिभेची उत्तुंग झेप यांची तुलना अरविंदांनी न्यायमूर्ती काशिनाथ त्र्यंबक तेलंग यांच्याशी केली आहे. तेलंगांच्या सर्वगामी प्रतिभेच्या झळाळीविषयी अतिशय आदराने बोलताना अरविंद पुढे म्हणतात, "काशिनाथ तेलंगांनी आपले लेखन प्रामुख्याने इंग्रजी भाषेत केले हे खरे. अशा, नंतर शिकून आत्मसात केलेल्या दुसऱ्या भाषेत डौलदार, बिनचूक आणि प्रसन्न लेखन करता येणे शक्य आहे, पण अशा लेखनात प्रतिभेला पूर्णांशाने न्याय मिळत नाही. आपल्यात साहित्यगुण बलवत्तर असताना प्रतिभेचे सगळे सामर्थ्य साहित्यनिर्मितीत पणाला लावायच्या ऐवजी तेलंगांच्या लेखणीने सर्व क्षेत्रात संचार केला ही आणखी मोठी चूक. बंकिमचंद्र अधिक भाग्यवान म्हटले पाहिजेत. त्यांनी आपल्या स्वतःच्या लालित्यपूर्ण अशा मातृभाषेत लेखन केले व त्यांची श्रेष्ठ निर्मिती ही साहित्यनिर्मिती होती......"

(Bankim Chandra Chatterji, श्री अरविंद, श्री अरविंद आश्रम, पाँडिचेरी, तृ.आ. १९९५, पृ. २० मधून)

■

**प्रेषक - विजया देव**

---

# अशोकाच्या शिलालेखांच्या भाषा

१) माहुलकर लिखित वृद्धिः च्या परीक्षणात म. अ. मेहेंदळे यांनी अशोकाच्या अरेमिक व ग्रीक लेखांसंबंधी शंका उपस्थित केली आहे. (भाषा आणि जीवन, दिवाळी २०००, पृ. ३६) त्याबाबत उपलब्ध माहिती येथे देत आहे.

१) अशोकाचा अरेमिक (Aramaic) भाषेतील एक लेख तक्षिला येथे सर जॉन मार्शल यांना १९१४-१५ साली सापडला. त्याच वर्षी खात्याच्या वार्षिक अहवालात तो प्रसिद्ध झाला. राधाकुमुद मुकर्जी यांनी त्यांच्या अशोकावरील पुस्तकात परिशिष्टामध्ये या लेखावर टिपण्णी केली आहे. याचा अर्थ पाकिस्तानात अशोकाचा अरेमिक लेख आढळतो.

२) शार-इ-कुना (कंदाहार, अफगाणिस्तान) येथील अशोकाचा अरेमिक-ग्रीक द्वैभाषिक लेख १९५८ साली प्रसिद्ध झाला. डि. सी. सरकार यांचे मते तो दुय्यम शिलालेख ४ चे भाषांतर होय. राधाकुमुद मुकर्जींच्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकात तो आढळतो.

३) कंदहार येथे केवळ ग्रीक भाषेतील अशोकाचा एक वेगळा लेखही सापडला आहे. रोमिला थापर यांच्या अशोकावरील पुस्तकात (१९६१) त्याचा उल्लेख आहे. मुख्य शिलालेख १२ व १३ चा सारांश या ग्रीक लेखात आढळतो.

याचा अर्थ माहुलकरांचे या बाबतचे विधान (वृद्धिः पृ.६०) चुकीचे ठरत नाही.

२) अशोकाच्या भाषांसंबंधी एक वेगळा मुद्दा येथे उपस्थित करावसा वाटतो. माहुरकरांच्या मते अशोकाची खरोष्ठी लिपींतील वचने पैशाची नावाच्या प्राकृत भाषेत आहेत. (वृद्धिः पृ. ६०) जाणकार या विधानाशी सहमत आहेत काय ? राधाकुमुद मुकर्जी अशोकाच्या लेखांच्या दोन प्रमुख भाषा मानतातः एक पूर्वी प्राकृत अर्थात मागधी व दुसरी पश्चिमी प्राकृत. उत्तरेत कालसी (उत्तराखंड) ते दक्षिणेत येरांगुडी (आंध्रप्रदेश) पर्यंतच्या लेखांची भाषा पूर्वी प्राकृत तर वायव्य सरहद्दीपासून गिरनारपर्यंतच्या लेखांची पश्चिमी प्राकृत, जिच्यावर संस्कृतचा

प्रभाव अधिक आढळतो. खरोष्ठी लिपींतील लेखही याच प्राकृतात आहेत. स्थानिक फेरफार असले तरी प्रमुख भाषा दोनच ठरतात.

दक्षिणेत अशोकाने वेगळी भाषा वापरली नाही ही गोष्ट त्यातून प्रतीत होते. अशोकाच्या काळात मध्यप्रदेश, उत्तरपथ, दक्षिणापथ या तीन विभागांत तीन बोली भाषा होत्या व मूळ मजकुराचे प्रात्यक्षिकरण त्या त्या स्थानिक बोलीत झाल्याचे द. ग. गोडसे लिहितात (समन्दे तळाश. पृ. १५-१६). त्याचा आधार काय ते मात्र कळत नाही. शिवाय त्यांचे विधान ढिसाळ वाटते.

सीमेवरील तामिळ राज्यांशी अशोकाचे मैत्रीपूर्ण संबंध होते. तामीळ भाषा तेव्हा उदयास येत होती. तरीपण अशोकाने तामीळीचा वापर केला नाही हे कसे? सुनितिकुमार चॅटर्जी यांचे नुसार सर्वांत जुने तामीळ शिलालेख ब्राह्मी लिपीत असले तरी ते अशोकानंतरचे होत.

वरील मुद्यांवर कुणी प्रकाश टाकील काय ?

■

**यशवंत रायकर**
**२०२, अे, रामकृष्ण, मोरयानगर, मनवेलपाडा रोड, विरार (पूर्व) - ४०१३०३**

---

मराठीचा अभ्यास आणि मराठी भाषा व साहित्य यांचे अध्यापन यांच्याविषयी येथे थोडा विचार करणे अप्रस्तुत होणार नाही. कारण आजच्या परिस्थितीत मराठी साहित्याचा योग्य अभ्यास व प्रसार हेच महाराष्ट्राच्या संस्कृतीच्या रक्षणाचे व विकासाचे एकमेव साधन आहे. जीवनाच्या दुसऱ्या कोणत्याही अंगोपांगांत आमचे वैशिष्ट्य उरले नाही. मराठी वेष, गृहरचना, शासन, समाजव्यवस्था ही सर्व देशव्यापी प्रवृत्तींनी समतल बनली आहेत, सर्व प्रदेशांत व सर्व समाजात सारखी झाली आहेत. त्याबद्दल आम्हांला खेदही नाही. भारतीय जीवनाच्या या अंगोपांगांत रस भरावयाचा असेल तर आमची मने जिवंत, व्यक्तित्वपूर्ण राहिली पाहिजेत. आमच्या नव्या पिढ्यांना आमच्या विशिष्ट सांस्कृतिक परंपरेच्या मूलस्रोताचे जीवन लाभले पाहिजे. ती मने आपल्या परंपरेच्या मातीत रुजली पाहिजेत. मग नंतर ती कितीही उंच जावोत, विविधतेने नटून फुलोत. यासाठी मातृभाषेचे मराठी साहित्याचे शिक्षण योग्य प्रकारे देणे हे एकच साधन आहे. मराठी साहित्य आमच्या तरुण पिढीच्या जीवनाचा एक आवश्यक भाग झाले पाहिजे.

■

**प्रा. कुसुमावती देशपांडे**
**(अध्यक्षीय भाषण, मराठी साहित्य संमेलन, ग्वाल्हेर १९६१)**

---



अनुक्रमणिका

# मराठीतील काही फारसी शब्दांचा संस्कृतशी संबंध : एक प्रतिक्रिया

म.अ. मेहेंदळे यांच्या 'मराठीतील काही फारसी शब्दांचा संस्कृतशी संबंध' ('भाषा आणि जीवन' वर्ष - १८, अंक - १, हिवाळा २०००) या लेखामध्ये पृष्ठ ८ वरील मजकूराविषयी -

एकदा फारसी भाषा संस्कृतशी संबंधित आहे हे मानले की त्यात बदला करता विशिष्ट नियमच लागले पाहिजेत असे म्हणणे चूक आहे. भाषाशास्त्रात उपयोग महत्त्वाचा. त्यातल्या वैशिष्ट्यांचा सारांश नियमांद्वारे दाखवता येतो पण ते निर्णायक नाहीत. उदाहरणार्थ, मित्र यामधला मित्र या अर्थी यार उसनवारीने आला आहे, असे मेहेंदळे म्हणतात ते बरोबर नाही. जार हा शब्द आपटे यांच्या Student's Sanskrit English डिक्शनरीप्रमाणे paramour या अर्थी आला आहे. त्याचप्रमाणे य ⟷ ज हा नियम मराठी व अन्य भारतीय भाषांत लागतो. जसे यार - जार, यम - जम, यति - जति, यारी - जारी, यजमान - जजमान, यंत्र - जंत्र इत्यादी. यमपासून पार्शांचा महाकर्मा हीरो जमशेद निघाला. यात्रा - जत्रा, यमुना - जमुना, यव - जव, युवान - जवान, युध्द - जुध्द, योगी - जोगी. तामीळभाषेत (लिपी) क, च, त, ट, प या संस्कृत उच्चार वर्गाकरता प्रत्येकी एकच अक्षर आहे. उदाहरण असे की पूर्वी कान्ती नावाचा साबण येत असे. त्याच्या जाहिरातीत तामीळ लिपित कान्ति लिहिलेले असे. पण तोच लिखित शब्द गांधींच्या फोटोबरोबर संबंधित असला तर त्याचा उच्चार गांधी होई म्हणजे असे की क, ख, ग, घ या चार अक्षरांकरता एकच अक्षर तसेच त, थ, द ध; प, फ, ब, भ; च, छ, ज, झ इत्यादी. याचा सरळ अर्थ असा की एके काळी या उच्चारांत फारसा फरक नव्हता. त्यामुळे द चा ध होत नाही, हे म्हणणे बरोबर नाही. अपवादानेच नियमसिध्द होतो म्हणतात, ते खोटे नाही.

■

**गौ. वा. पाध्ये**

**७, आनंदवन, ए - ६, पश्चिम विहार, नवी दिल्ली ११० ०६३.**

## श्री. गौ. वा. पाध्ये यांच्या पत्रावर प्रतिक्रिया

श्री. पाध्ये यांचे पत्र 'मराठी भाषा आणि जीवन'च्या संपादकांनी माझ्याकडे पाठवले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

दोन भाषा संबद्ध असल्याचे 'मानले' म्हणजे त्यात आढळणाऱ्या बदलाविषयी नियम सांगितले पाहिजेत असे नाही, ह्याचा अर्थ मला कळला नाही. दोन भाषांत मूलभूत शब्दांच्या बाबतीत अर्थसाम्य आणि ध्वनिसाम्य आढळले तर त्या कोणत्यातरी एका भाषेपासून उद्भवल्या असल्याचे ठरविणे शक्य होते. मग त्या शब्दांच्या जोड्यांत जे वैषम्य आढळते त्यासाठी काही नियमबध्द व्यवस्था आहे की नाही हे पहावेच लागते.

श्री. पाध्ये यांना मराठीत 'मित्र' ह्या अर्थी वापरात असलेला यार हा शब्द संस्कृत जारपासून साधता येतो असे सुचवायचे आहे असे वाटते. पत्राच्या सुरवातीस 'नियम सगळेच पाहिजेत' असे नाही म्हटल्यावर संस्कृत 'जार' मराठी 'यार' हे सिध्द करण्यासाठी 'य' > 'ज' ह्या परिवर्तनाची उदाहरणे देऊन तो एक नियम् असल्याचे श्री. पाध्ये निदर्शनास आणू पाहतात! श्री. पाध्ये यांनी दिलेल्या उदाहरणांवरून त्यांना अभिप्रेत असलेली यार शब्दाची व्युत्पत्ती सिध्द होत नाही, कारण संस्कृत 'ज' उच्चाराचे जागी मराठीत 'य' उच्चार असल्याचे उदाहरण नाही. श्री. पाध्ये देत असलेली सारी उदाहरणे 'य' > 'ज'ची आहेत. 'ज' > 'य'ची नाहीत. खेरीज यारचा paramour हा अर्थ दुय्यम आहे. फारसीत त्याचा मुख्य अर्थ 'मित्र' हाच आहे. मला मिळालेल्या माहितीप्रमाणे फारसीत यारला paramour असा अर्थ नाही. 'मित्र' हा मूळ अर्थी मराठीतला यार हा शब्द फारसीतून उसनवारीने आला आहे असे मानणे प्राप्त आहे.

ह्या संदर्भात श्री. पाध्ये यांनी तामीळ लिपी आणि उच्चार या विषयी जे लिहिले आहे त्याचे प्रयोजन माझ्या लक्षात आले नाही.

■

**म. अ. मेहेंदळे**

**१. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे :

वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १०० फक्त
व्यक्तीला रु. ७५ फक्त
परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर

**२. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता : नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**३. मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/-

**४. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाऊसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**५. जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान ७५० रु., अर्धेपान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ तीन / चार ८०० रु. जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

R.N.I.नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

- **आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?**

➢ सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

➢ सभासद असाल, तर देणगीदार आणि वार्षिक सभासद मिळवून द्या.

➢ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर कार्यवाहांशी संपर्क साधा.

➢ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

➢ परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.

➢ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

- **आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?**

➢ लेखन पाठवा.

➢ परभाषांतून अनुवाद करा.

➢ ग्रंथपरीक्षणे लिहा.

➢ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजुकराबद्दल सूचना पाठवा.

➢ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

➢ पत्रिकेत भाषा व्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

➢ जाहिरात मिळवून द्या.

➢ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

---

**संपर्क**

**मराठी अभ्यास परिषद**

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५,
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२.
(दू. क्र. ४४८६०१५)